॥ श्रीराम ॥

"—म्हणोनि कर्तृत्व जितुकें जालें। तें शारदा-गुणें"

—श्रीसमर्थ रामदास

# नि र्झ रि णी

स. र. पंतसचिव

सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

यांचा निवडक कविता-संग्रह

---

प्रस्तावना-लेखक—प्रो. वामन मल्हार जोशी, एम्. ए.

---

श्रीरामनवमी, १८५४

गणेश महादेव आणि कंपनी, पुणें शहर

किंमत १ रुपया

# प्रकाशकाचे दोन शब्द



" निर्झरिणी " हा काव्यसंग्रह पुढें येण्यास अपेक्षेबाहेर उशीर झाला याबद्दल महाराष्ट्र-रसिक स्नेहभावामुळें आमच्यावर जरा रागावले असतील हें खरें; पण आज तो पुस्तकरूपानें हातीं येतांना पाहून ते त्याचा मोठ्या आनंदानें व कौतुकानें स्वीकार करतील असा भरंवसा वाटतो.

भोर संस्थानचे युवराज श्रीमंत भाऊसाहेब पंतसचिव व त्यांच्या पत्नी युवराज्ञी श्री. सौ. सरोजिनीबाईसाहेब यांनीं आपला 'निर्झरिणी' काव्य-संग्रह गेल्या श्रीरामनवमीच्या दिवशीं प्रकाशित करून त्याची हस्तलिखित प्रत श्रीमंत बाबासाहेब पंतसचिव, चीफ् ऑफ् भोर यांचे चरणीं सादर समर्पण केली. या समर्पण-समारंभाचे वेळीं महाराष्ट्रांतील बरीच विद्वान मंडळी व साहित्यभक्त उपस्थित असल्यानें सदर समारंभ म्हणजे, श्रीमंत सरकार पंतसचिव यांनीं म्हटल्याप्रमाणें एक छोटेंसें साहित्य-संमेलनच होय असें म्हणणें अतिशयोक्तीच्या सदरांत येईल असें वाटत नाहीं.

प्रस्तुत 'निर्झरिणी' काव्यसंग्रहाचे प्रकाशकाची भूमिका घेण्याचा सुप्रसंग श्रीमंत युवराजसाहेब व युवराज्ञी श्री. सौ. सरोजिनीबाईसाहेब यांचे अनुग्रहानेंच आम्हांस लाभला ही अभिमानाची गोष्ट येथें नमूद करावीशी वाटते. ही सुसंधि आम्हास दिल्याबद्दल आम्हीं उभयतां श्रीमंत युवराजसाहेब व श्रीमती युवराज्ञीसाहेब यांचे फार ऋणी आहोंत.

या काव्यसंग्रहास हिंगणें येथील महिला-विद्यालयाचे अध्यापक व मराठीचे साहित्याचार्य प्रो. वा. म. जोशी, M.A. यांनीं आपला अमोलिक वेळ खर्चून विद्वत्तापरिपूर्ण अशी मार्मिक प्रस्तावना लिहून दिल्या-

मुळें प्रस्तुत काव्यसंग्रहास जी एकप्रकारें अपूर्व शोभा आणून दिली आहे त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोंत. तसेंच संगीत-शास्त्रज्ञ प्रो. कृष्णराव मुळे यांनीं वेळांत वेळ काढून काव्यांतील कांहीं पदांचें स्वर-लेखन व गोड चाली देऊन आम्हास उपकृत केलें आहे. त्याचप्रमाणें श्रीमंत युवराजांचे सेक्रेटरी रा. रा. सदाशिवराव पुरोहित यांनींहि आम्हाला पुष्कळ मदत केली.

वस्तुतः या ग्रंथाचें प्रकाशन यापूर्वींच व्हावयाचें; परंतु गेल्या वर्षां-तील अनेक अडचणींमुळें आम्हाला हें कार्य आजवर पुरें करतां आलें नाहीं. आमच्या अडचणींचा सहानुभूतीनें विचार करून श्रीमंत युवराज-साहेब यांनीं या अक्षम्य विलंबाबद्दल आम्हाला थोर अंतःकरणानें क्षमा केली याबद्दल आम्ही त्यांचे फार ऋणी आहोंत.

शेवटीं या काव्यसंग्रहाचा महाराष्ट्रीय काव्यरसिकांकडून योग्य सत्कार होऊन तो या कविद्वयाच्या काव्यस्फूर्तीस पोषक होवो व अशा रीतीनें त्यांची विकासोन्मुख काव्यशक्ति अधिक ओजस्वी व स्फूर्तिदायक होऊन ती महाराष्ट्रीय रसिकांचें रंजन करो, अशी श्री प्रभु रामचंद्रचरणीं प्रार्थना करून हा उल्लेख संपवितों.

चालक—गणेश महादेव आणि कंपनी

# अनुक्रमणिका



# प्रस्तावना

भोर संस्थानचे युवराज श्रीमंत स. र. पंतसचिव व युवराज्ञी सौ. सरोजिनीबाई पंतसचिव या उभयतांनीं मला एक दिवस ' निर्झरिणी '—नामक आपला हस्तलिखित कविता-संग्रह दाखवून त्याला मी प्रस्तावना लिहावी अशी जेव्हां इच्छा प्रदर्शित केली तेव्हां मी प्रथम कांकूं करूं लागलों व म्हटलें कीं " प्रस्तावनेची मुळींच जरूर नाहीं. धार्मिक क्षेत्रांत कन्यादानाच्या विधीकरितां उपाध्यायाची जरूर असेल, पण वाङ्मय-क्षेत्रांत तरी कविता-सुतेला रसिक वराच्या हातांत देतांना मध्यस्थाची आवश्यकता नाहीं." माझ्या मनांतला खरा किन्तु उभयतांनीं दोनचार मिनिटांतच ओळखला व " प्रस्तावना लिहावयाची म्हणजे स्तुति करावयाची अशी आमची अपेक्षाच नाहीं; आपण योग्य ते दोष निर्भीडपणें व आमचें लौकिक उच्च पद विसरून दाखविलेत तरी हरकत नाहीं, किंबहुना दाखवावेत अशीच आमची इच्छा आहे " असें परोपरीनें सांगितलें. त्यांचें हें बोलणें वरकरणी नसून मनापासूनचें होतें व उभयतांच्या संभाषणांत एक प्रकारचा मोहक प्रेमळपणा होता,—इतका कीं प्रस्तावना लिहिण्यास सांगून त्यांनीं आपला जो सन्मान केला आहे तो स्वीकारतांना अधिक आढेवढे घेणें म्हणजे स्वतःचें उगाच फाजील स्तोम माजविण्यासारखें आहे असें मनांतल्या मनांत मला एकसारखें वाटूं लागलें आणि अखेर प्रस्तावनालेखकाचें काम मी आनंदानें स्वीकारलें. माझ्या प्रस्तावनेची ही प्रस्तावना लिहिण्याचें कारण असें कीं, पुढील भागांत यदाकदाचित् कोठें कोणाला ' भाट-पणा ' दिसून आला तर तो माझ्या बुद्धीच्या व स्वभावाच्या दोषामुळें होय असें सर्वांना समजावें. टीकेच्या बाबतींत मला उभयतांनीं पूर्ण मुभा दिली होती व भाडभीड किंवा संकोच न धरतां लिहिण्यास सांगितलें होतें हें न सांगणें अन्यायाचें झालें असतें, म्हणूनच त्याचा येथें निर्देश केला आहे.

या काव्यग्रंथांत युवराजांच्या ३१ कविता आहेत व युवराज्ञींच्या २० कविता आहेत. बहुतेक कविता स्वयंपूर्ण आहेत; दोनतीन मात्र '**उद्धार**' व '**योगीन्द्र**' या लवकरच प्रसिद्ध होणाऱ्या खंडकाव्यांतील उतारे आहेत. या संग्रहांतील कविता स्फुट भावगीतें व सुनीतें, तसेंच भक्ति-रसात्मक लघु पद्यें, अशा स्वरूपाची आहे. कवि-कवयित्रींना संसारयात्रा करतांना हरतऱ्हेच्या प्रसंगांत व देखाव्यांत जें सौन्दर्य किंवा जें गांभीर्य दिसलें तें पाहून या सौन्दर्याचे व गांभीर्याचे वांटेकरी इतरांनीं व्हावें अशा ऊर्मी त्यांच्या हृदयांत उत्पन्न झाल्या व या ऊर्मी प्रस्तुत कवितांच्या द्वारें मधुर असें व्यक्त स्वरूप पावल्या आहेत.

या कवितांत इतरांचें अनुकरण करण्याची इच्छा नाहीं असें नाहीं, पण हें अनुकरण अंध नाहीं व कृत्रिम नाहीं. उदाहरणार्थ, यांतील सर्व सुनीतांत चौदा चरणांचा संकेत पाळला आहे, पण हा संकेत कांहीं अंशीं साधार व संयुक्तिक आहे म्हणून तो शल्याप्रमाणें बोंचत नाहीं. पण कांहीं कवींच्या सुनीतांत पहिल्या व चवथ्या चरणांचें यमक साधण्याचें अंध अनुकरण जें दिसतें तें येथें मुळींच दिसत नाहीं. बहुतेक सर्व कवितांचा उगम जेथें व्हावयास पाहिजे तेथेंच, म्हणजे हृदयांतच, झाला आहे व त्यांना छंदोबंधनाप्रमाणें कलाविषयक औचित्याचेंहि बंधन आहे.

या कवितांची लांबी पाहिली तर ६ चरणांपासून ९६ चरणांपर्यंत निरनिराळ्या लांबीच्या या कविता आहेत. काव्याची योग्यता लांबीवरून ठरविणें मूर्खपणाचें आहे हें खरें. कांहीं लघु व स्फुट काव्यें हिऱ्यां-मोत्यांप्रमाणें मौल्यवान् असतील व कांहीं आकारावरून ठरलेलीं 'महा'-काव्यें रस काढून टाकलेल्या उंसाच्या चोयट्यांच्या राशीप्रमाणें टाकाऊ असतील. तथापि हीहि गोष्ट कांहीं खोटी नाहीं कीं, एक चांदणी कितीहि सुंदर दिसली तरी चंद्रानें अधिष्ठित असलेल्या व असंख्य तारकांनीं अलंकृत केलेल्या तारांगणाची योग्यता तिच्याहून निराळीच! एखादें फूल किती जरी मनोरम असलें तरी त्याला जशी हाराची योग्यता येणार नाहीं, किंवा एखादें लहानसें फुलझाड त्यावरील सुंदर फुलांमुळें कितीहि जरी मोहक वाटलें तरी हरतऱ्हेच्या झाडांनीं, लतांनीं, व पुष्करिणींनीं सुशो-

भित केलेल्या मोठ्या बागेची किंमत त्या लहान फुलझाडाला जशी यावयाची नाहीं, तशीच लघुकाव्याला महाकाव्याची योग्यता यावयाची नाहीं. या दृष्टीनें पहातां, मराठीच्या काव्यसंपत्तींत अलीकडे पुष्कळ जरी भर पडत असली व ही भर चांगली व विविध प्रकारची असली, तथापि या संपत्तीनें रसिकांचें पूर्ण समाधान झाल्यासारखें कां वाटत नाहीं याचें एक कारण ध्यानांत येईल.

मी कांहीं आधुनिक काव्याचा द्वेष्टा नव्हे किंवा आधुनिक काव्य-पुष्पांतील मध अल्प म्हणून ती चाखायचीच नाहीं, किंवा चाखली तर क्विनाइन खाल्ल्याप्रमाणें तोंड करावयाचें, अशा प्रकारचा बहाणा मला करावयाचा नाहीं. त्याचप्रमाणें पुरातनाचीं व 'सांकेतिका'चीं स्तोत्रें गाणाऱ्यांपैकीं मी एक नाहीं. खरें म्हटलें तर आधुनिकांचे यथा-काम व निरंकुश कलाविहार पाहून मला आनंद होतो. त्यांचे दोष मी काढले तर कलादृष्टीनें ते दोष दिसतात म्हणून ते काढतों, पुरातनत्व किंवा सांकेतिकत्व त्यांनीं सोडलें म्हणून नव्हे. असें असूनदेखील व अलीकडे पुष्कळ सुंदर स्फुट कविता मला वाचावयास व ऐकावयास मिळत असल्या तरीदेखील, महाकाव्याचा आधुनिक मराठीच्या द्वारें आस्वाद घ्यावा अशी माझी फार दिवसांची जी तहान आहे ती अद्यापि अतृप्त आहे हें मला कबूल केलें पाहिजे. कै.कुंट्यांचें 'राजा शिवाजी' हें काव्य किंवा सांगलीचे माझे मित्र 'साधुदास' मुजुमदार यांचीं 'वनविहार' व 'रणविहार' हीं काव्यें चांगलीं असलीं तरी तीं पूर्ण समाधान देऊं शकत नाहींत हें उघड आहे. कुंट्यांच्या 'राजा शिवाजी'मध्यें नावीन्य आहे, पण सौन्दर्याचें प्रमाण कमी; साधुदासांच्यामध्यें माधुर्य आहे, पण ते जुन्याचें सुंदर अनुकरण करतात यामुळेंच उत्पन्न झालेलें आहे. 'गिरीशां'ची अंबराई रम्य आहे, पण तींत महाकाव्याचें रम्य विशालत्व व भव्योदात्तत्व हीं नाहींत; तींत पदलालित्य आहे, पण विचारांचें उच्च उड्डाण नाहीं. माझे मित्र माधव ज्यूलियन् यांच्या 'सुधारकां'त कौतुकास्पद नावीन्य आहे, रम्य साहस आहे, चटक लावणारा ( पण कित्येक ठिकाणीं चटके देणारा ! ) चटकदारपणा आहे, रसविविधता

आहे, पण अनेक सुरम्य स्थलांतून हरतऱ्हेचीं वळणें घेत जोरानें जाणाऱ्या लहान नदीच्या प्रवाहाची 'सुधारक' वाचून आठवण होते, गंभीर गंगा-प्रवाहाची आठवण होत नाहीं. भव्योदात्त महाकाव्याच्या रसास्वादाची तहान अतृप्त आहे याचें कारण माझी आत्मवंचना करून माझ्या हृदयांत वास करणारी माझी पुराणप्रियता म्हणावी, कीं खरोखरच मला पाहिजेत तशीं काव्यें आधुनिक कालांत उत्पन्न झालेलीं नाहींत असें म्हणावें ? मला वाटतें दुसराच पक्ष खरा आहे

माझ्या मताचा, अभिरुचीचा किंवा आवडीनिवडीचा प्रश्न व्यक्ति-विषयक म्हणून बाजूला ठेविला तरी महाकाव्यें अलीकडे कां होत नाहींत व प्रस्तुत काव्यसंग्रहाप्रमाणें स्फुटकाव्यात्मक ग्रंथच कां निर्माण होतात हा प्रश्न टाळतां येण्यासारखा नाहीं. ही कारण-मीमांसा कठीण आहे, व करूं लागल्यावर थोडक्यांत ती आवरणें कठीण. तथापि कांहीं मुद्यांचा विचार करण्यास हरकत नाहीं.

## ज्ञानाची प्रगति म्हणजे कवित्वाची परागति ?

कित्येकांना असें वाटतें कीं ज्ञान फार वाढल्यामुळें (—'अक्कल' फार वाढल्यामुळें म्हणा पाहिजे तर!) कवित्व अशक्यप्राय होत चाललें आहे, अर्थात् महाकाव्य सुतराम् अशक्यप्राय झालें आहे. मेकॉलेनें मिल्टनवरील आपल्या सुप्रसिद्ध निबंधांत संस्कृतीच्या प्रगती-बरोबर कवित्वाची परा-गति होते असें प्रमेय मांडलें व तें कांहीं लोकांना प्रथम-दर्शनीं खरें दिसलें. पण बारकाईनें विचार केल्यावर आधिभौतिक काय, आध्यात्मिक काय, किंवा कोणत्याहि काय, ज्ञानाचा व कवित्वाचा अहिनकुलवत् किंवा तमः प्रकाशवत् विरोध आहे हें खरें दिसत नाहीं. ज्ञानानें असें काय केलें आहे कीं त्यामुळें कवित्वानें त्यापासून भिऊन चार पावलें दूर असावें ? ज्ञानाच्या उष्णतेनें कवित्व करपतें, ज्ञानाच्या प्रखर प्रकाशांत कवि-त्वाचे डोळे दिपतात, इत्यादि प्रकारची अलंकारिक भाषा तर्कशुद्ध प्रमाणाची योग्यता पावूं शकत नाहीं. कविता-देवीला शब्दचित्रलेखनाकरितां व इतर वाग्विलासाकरितां अंधारी रात्र प्रिय असली म्हणून मनुष्यजातीच्या किंवा व्यक्तीच्या अज्ञानान्धकारांतच तिला वाचा फुटते, किंवा तिची वाणी मधुरता

धारण करते असें का म्हणावयाचें आहे ? अरुणोदय व उषःकाल काव्यात्मक वर्णनाला अनुकूल असतात, म्हणून मानवी संस्कृतीचा किंवा व्यक्तीच्या शैक्षणिक संस्कारांचा अरुणोदय किंवा उषःकाल कवित्वस्फूर्तीला अनुकूल असतो असें तर म्हणणें नाहीं ? त्यांतली खरी गोष्ट अशी आहे कीं, ज्ञानामध्यें किंवा अनुभवामध्यें प्रगति होऊन मनुष्याला किंवा मनुष्य-जातीला प्रौढत्व आलें तर त्यामुळें कविता-देवी लाजते, किंवा रुसते, किंवा रागावते, अथवा क्षीण होते, या म्हणण्याला इतिहासाचा किंवा तर्काचा कांहींच आधार नाहीं. टेनिसन, ब्राऊनिंग, गटे ( Goethe ), हे काय अज्ञानयुगांतले आहेत, का ते अज्ञानी होते ? रवीन्द्रनाथ टागोर हे चांगले ज्ञानी, विचारी, अनुभवी व तत्त्वचिकित्सक आहेत; मग कवित्वानें त्यांच्याशीं कशी गट्टी केली ? ज्ञानावर जर कविता-देवीचा राग असता व अज्ञान जर तिला प्रिय असतें तर ज्ञानविहीन बालक हा उत्तम कवि झाला असता व व्यास-वाल्मीकि इत्यादि पौरस्त्य कवि किंवा मिल्टन-शेक्स्पिअर इत्यादि पाश्चात्य कवि यांनीं वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध झाल्यावर जी कविता केली ती कविता त्याज्य ठरली असती; पण तज्ज्ञांना तशी ती वाटत नाहीं ! कांहीं ज्ञानी लोकांमध्यें कवित्व नसतें ही गोष्ट खरी आहे, पण कवित्वाभावाचें कारण त्यांचें ‘ ज्ञान ’ नव्हे, तर प्रतिभेचा अभाव हें होय. कांहीं असंस्कृत माणसांवर कवितादेवीचा वरदहस्त असतो हेंहि खरें, पण त्यांचें असंस्कृतत्व हें कांहीं कवितादेवीच्या कृपाप्रसादाचें कारण नव्हे, तर त्यांचें सहृदयत्व हें त्याचें खरें कारण होय. केवळ ज्ञान हें काव्य निर्माण करूं शकणार नाहीं; पण तें काव्यस्फूर्तीस विरोधहि करीत नाहीं; झालें तर उपकारक होतें. ‘कवि’ याचा अर्थ एके काळीं ‘ ज्ञानी ’ असा होता. ( **किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः**—इत्यादि वचनांची येथें कांहींजणांना आठवण होईल.) विद्वान् असून कवि असलेल्यांचीं किती तरी उदाहरणें देतां येतील, व या उदाहरणांचा विचार केला असतां असें दिसून येईल कीं विद्वत्व हें जसें सौजन्याच्या आड येत नाहीं, त्याप्रमाणेंच विद्वत्व हें कवित्वाच्याहि आड येत नाहीं, कारण कवित्व हें निराळ्याच गोष्टींवर अवलंबून आहे.

बाल्यांतील मुग्धत्वाचें रम्यत्व कवींनीं **'रम्य तें बालपण देईं देवा'** अशा रीतीनें गावें पाहिजे तर; त्याचप्रमाणें **'पाण्डित्यं निर्विद्य बाल्येन तिष्ठासेत्'** असें म्हणून वेदान्त्यांनीं बाल्याचें एका दृष्टीनें कौतुक करावें पाहिजे तर; पण व्यक्तीच्या किंवा जातीच्या बाल्यांतील अज्ञान व संस्कारहीनत्व हीं कवित्वाला पूर्वी पोषक झालीं किंवा हल्लीं होतात असें मानण्यास आधार नाहीं हें ध्यानांत धरावें.

ज्ञान हें कवित्वाला विरोधक नाहीं, तर उपकारक व उद्बोधक आहे असेंहि दाखवितां येईल, पण झाला आहे विस्तार तेवढ्यावरून वाचकांना बहुधा पटलें असेल कीं, महाकाव्याच्या निर्मितीला अलीकडील ज्ञान-वृद्धीनें अडथळा केला आहे हें म्हणणें अयुक्तिक व अनाधार आहे.

## परिस्थिति कारणीभूत ?

अलीकडे लेखकांना महाकाव्यें लिहिण्यास व वाचकांना वाचण्यास वेळ किंवा फुरसत मिळत नाहीं म्हणून, व 'मागणी तसा पुरवठा' या न्यायानें लघुकाव्यें व लघुकथा यांचीच फार मागणी असल्यामुळें, महा-काव्याचा पुरवठा अलीकडे होत नाहीं, या युक्तिवादांतहि सयुक्तिकता नाहीं. वाचकांना महाकाव्यें वाचण्यास फुरसत नाहीं हें म्हणणें तर हास्यास्पदच आहे. मोठमोठ्या कादंबऱ्या व 'गीतारहस्या'सारखे मोठ-मोठे ग्रंथ जर अलीकडे बाहेर पडूं शकतात व खपतात तर महाकाव्यां-नींच असें काय केलें आहे कीं त्यांच्या बाबतींत मात्र हा न्याय लागू पडूं नये ? तसेंच कवीला किंवा कोणत्याहि लेखकाला फुरसत नाहीं हें म्हणणेंदेखील बहुधा व बऱ्हंशीं खोटेंच असतें. ज्याच्याजवळ विचार आहेत, कल्पना आहेत, उत्साह आहे, तो वेळांत वेळ काढतो व रात्रीचा दिवस करून व आपल्या विषयाशीं तद्रूप होऊन कलात्मक निर्मिति करूं शकतो. अपवाद कांहीं असतील, पण सामान्य नियम हा असा आहे. निर्मिति झाली तरी वाचक मिळाले पाहिजेत ना, असा कोणी येथें प्रश्न विचारला तर त्याला उत्तर असें कीं कलाकृति जी निर्माण होते ती बाजारांतल्या खाद्य-पेयादि जिनसांच्याप्रमाणें 'मागणी व पुरवठा' या अर्थ-शास्त्रीय

न्यायाप्रमाणें होत नाहीं. काव्यनिर्मितीचें काय किंवा इतर कलाकृतींचें काय, 'अर्थशास्त्र' निराळेंच आहे ! कलाविलासाचा आनंद इतरांना मिळावा व त्यांनीं आपली वाहवाहि करावी असे हेतु जरी थोड्याबहुत प्रमाणांत कलानिरत मनुष्याच्या मनांत वावरत असले तरी कलाकृति निर्माण करतांना रसलोलुपांची संख्या तो मोजीत बसत नाहीं किंवा त्यांच्या 'वाहवा'-च्या टाळ्या मधून मधून ऐकूं आल्या नाहींत म्हणून अडून बसत नाहीं. महाकाव्याला अनुकूल असें रम्योदात्त, रम्यविशाल, रम्याद्भुत, रम्य-भीषण इत्यादि प्रकारचे विषयच अलीकडील व्यावहारिक, शास्त्रीय, नीरस, गद्यात्मक जगांत मिळत नाहींत ही रडहि अशीच निरर्थक आहे. आधीं कोणताहि काळ गद्यात्मक असतो हें म्हणणेंच खोटें आहे. काळ गद्यात्मक नसतो, तर मन गद्यात्मक असतें. पहाणाऱ्याला काव्य सगळीकडे आहे; काव्यदृष्ट्या जो अंधळा असेल त्याला सगळें जगच अंधळें व अंधारानें भरलेलें दिसावयाचें. पूर्वी काव्याला विषय चांगले मिळत व हल्लीं मिळत नाहींत या म्हणण्यांत अर्थ काय ? पूर्वी युद्धें किंवा महायुद्धें होत होतीं आणि अलीकडे होत नाहींत असें नाहीं. पूर्वीच राष्ट्रांराष्ट्रांमध्यें किंवा संस्कृती-संस्कृतीमध्यें लढे होते आणि अलीकडे ते लढे नष्ट झाले आहेत असेंहि नाहीं. चंद्रकला, तारका, उषा वगैरे पूर्वी जशा होत्या तशाच हल्लीं आहेत. बायका पूर्वी सुंदर होत्या आणि अलीकडे कुरूप झाल्या आहेत असें नाहीं. सूर्य व नवग्रह पूर्वी जसे होते तसेच हल्लीं आहेत. काम-क्रोध-लोभादि षड्रिपूंनीं हल्लीं रिपुत्व सोडून शस्त्रसंन्यास केला आहे असें ऐकिवांत नाहीं. मग महाकाव्याला अनुकूल विषय नाहींत या म्हणण्याचा अर्थ काय ? खरा प्रकार असा आहे कीं अभाव काव्यात्मक दृष्टींचा आहे; विषयांचा नाहीं. नैतिक दृष्ट्या ज्याप्रमाणें एखाद्याची विषयवासना क्षीण होते, पण विषय कधीं संपले नाहींत किंवा संपावयाचे नाहींत, त्याप्रमाणेंच काव्य-दृष्ट्याहि विषय कधीं संपले नाहींत व संपावयाचे नाहींत. काव्यदृष्टि किंवा काव्यात्मक वृत्ति असेल त्याला विषयांचा कधीं तुटवडा पडला नाहीं, व पडणार नाहीं. प्रेमळ आईला बोबड्या मुलाचें कौतुक करण्याला जसे हरघडी विषय मिळतात, किंवा प्रेममोहित तरुणाला ज्याप्रमाणें आपल्या प्रेमविषयक रमणी-

मध्यें क्षणोक्षणीं रमणीय नवता भासमान होते, त्याप्रमाणेंच लघुकाव्याला किंवा महाकाव्याला अनुकूल असलेली दृष्टि व वृत्ति ज्याच्यामध्यें आहे त्याला नवीन नवीन विषयांची वाण पडत नाहीं. पण सावत्र आयांना बोबड्या मुलामध्यें जसें कौतुकास्पद कांहींच दिसत नाहीं, किंवा वेदाभ्यासजड वृद्धांचें चित्त जसें युवतींच्या लीलांनीं द्रवत नाहीं, त्याचप्रमाणें महाकाव्यनिष्पत्तीला आवश्यक असलेली दृष्टि व वृत्ति ज्यांच्यामध्यें नसते त्यांना अलीकडच्या जीवनांत महाकाव्याला अनुकूल विषय मिळत नाहींत. काव्यनृत्य करूं शकणाऱ्याला तारांगण चालतें, रणांगण चालतें, नृपांगण चालतें, व स्मशानांतहि रुंडमालाधर शंकराप्रमाणें तो तांडवादि बीभत्स-भयानकादि रस उत्पन्न करणारें नृत्य करूं शकतो. उच्चतम काव्यनृत्य ज्यांना करतां येत नाहीं त्यांना मात्र सर्वत्र वांकडींच अंगणें दिसतात, विषय दिसतच नाहींत व परिस्थितिच प्रतिकूल असते !

परिस्थितीचा व काव्याचा संबंध काय या मुद्द्याचा वरील एका वाक्यांतच वास्तविक समारोप करतां येईल. पण एतद्विषयक कांहीं गैरसमज दूर करण्याकरितां थोडासा विस्तार करणें जरूर आहे. अलीकडे पुष्कळ लोकांना असें वाटतें कीं बऱ्याच गूढ गोष्टींचा कार्यकारणभाव आपणांस कळला आहे. कार्यकारणभावविषयक आपलें अज्ञान कबूल करणें मनुष्यमात्राला केव्हांहि जड वाटतें, म्हणून पूर्वी अज्ञात कारणाला जेथें ‘ देव ’ म्हणत, किंवा ‘ दैव ’ म्हणत, तेथें अलीकडे हे शब्द मागें पडत जाऊन त्यांचेएवजीं ‘ परिस्थिति ’ हा शब्द वापरण्यांत येतो. कित्येक वेळां ‘ परिस्थिति ’ हें कारण असतें खरें, पण कित्येक वेळां या शब्दानें ज्ञानाचा केवळ आभास उत्पन्न होतो व कित्येक वेळां तर ‘ परिस्थिति ’ हें कारण नसून उलट कार्य असतें ! बीज आधीं कीं फळ आधीं या वादाप्रमाणें या वादाची बहुधा स्थिति असते.

हा वाद वाङ्मयक्षेत्रांतच नव्हे तर आधिभौतिक शास्त्रांत, राजकारणांत, समाजकारणांत व इतरत्रहि दिसून येतो. आधिभौतिक शास्त्रांत प्राणिवर्गाचा विकास कसा झाला याची उपपत्ति लावतांना लामार्क (Lamarck) व डार्विन यांच्या ( सामान्यतः प्रतिपादण्यांत येणाऱ्या) ‘ परिस्थिति ’वादी मताविरुद्ध

Vitalism, Creative Evolution वगैरे तत्त्वें प्रतिपादण्यांत येतात. राजकारणांत, इतिहासशास्त्रांत, समाजकारणांत महाभारतांत म्हटल्याप्रमाणें **कालो वा कारणं राज्ञः राजा वा कालकारणम्** हा प्रश्न निरनिराळ्या स्वरूपांत दृष्टोत्पत्तीस येतो व त्याचें उत्तर **राजा कालस्य कारणम्** असें, किंवा '**कालोऽस्ति कारणं राज्ञः**' असें निरनिराळ्या लोकांकडून देण्यांत येतें. असला कठीण, व्यापक व गुंतागुंतीचा प्रश्न एकदोन पानांत आवरणें अशक्य आहे. तथापि अर्धवट सूत्रात्मक पद्धतीनें माझ्या मताचें दिग्दर्शन वाङ्मयक्षेत्रांतील उदाहरणें घेऊन करतां येईल.

महाराष्ट्रांतील संतवाङ्मयांत जी निवृत्ति दिसून येते तिला परिस्थिति कितपत कारणीभूत झाली हाच एक मर्यादित प्रश्न हातीं घेतला तर माझें म्हणणें थोडक्यांत सुचवितां येईल. 'काव्य आणि काव्योदय' या पुस्तकांत प्रो. वासुदेव बळवंत पटवर्धन यांनीं असें प्रतिपादन केलें आहे कीं राजकीय दुःस्थितीमुळें हा निराशा-वाद उत्पन्न झाला. पण कै. वि. का. राजवाडे यांचें मत कवींच्या निराशा-वादामुळें राजकीय दुःस्थिति आली असें एके काळीं होतें! शिवाजीच्या आधींचा काळ जुलमाचा व अंदाधुंदीचा होता म्हणून रामदास उत्पन्न झाले व शिवाजीहि या परिस्थितीमुळेंच उत्पन्न झाला व कार्य करूं शकला असें कांहीं म्हणतात, तर याच्या उलट शिवाजी व रामदास या दोघांनीं ( सहकारितेनें म्हणा किंवा स्वतंत्रतेनें म्हणा ) काळाचा ओघ बदलला व नवीन काल निर्माण केला असें कांहींजण प्रतिपादितात! कालौघाकडे जर कर्तृत्व असतें, तर कालौघामुळें 'रामदास' व 'तुकाराम' अशीं परस्परविरोधी कार्यें कशीं झालीं? दैन्याच्या, छळाच्या व दुर्दशेच्या काळांत ( व काळांतच नव्हे तर काळामुळें ) निवृत्तिपर कवी झाले असें म्हणावयाचें, तर छत्रपतींच्या राज्यारोहणाच्या काळांत, किंवा पेशवाईंतल्या अटकेपार झेंडा नेणाऱ्या काळांत ( व काळामुळें ) प्रवृत्तिपर कवी निर्माण व्हावयास पाहिजे होते. पण रामदासांशिवाय दुसरें नांवच डोळ्यांपुढें येत नाहीं. शिवाजीच्या पूर्वींहि महाराष्ट्रानें 'पुलकेशी' राजाच्या द्वारें पराक्रम गाजविला होता; त्या

वेळेस किंवा लगेच तदनंतर आशावादी कवी कोणते व किती झाले ? परिस्थितीकडे कर्तृत्व मानलें तर दुसऱ्या बाजीरावाच्या शिमगी चांदण्याच्या व मैना-राघूंच्या काळांत तमासगीर जसे झाले, तसे मोरोपंतासारखेहि कवि कां निर्माण व्हावे, हा प्रश्न उत्पन्न होतो. परिस्थिति व व्यक्तिवैशिष्ट्य या दोहोंचा संघात किंवा संयोग हें कारण मानलें तर वरील कांहीं कूटें कांहीं अंशीं सुटतील,—अथवा खरें बोलायचें म्हणजे, सुटल्यासारखीं वाटतील ! परिस्थिति कारणीभूत होत असली तर ती कशी होते हें जोंपर्यंत सांगतां येत नाहीं तोंपर्यंत तिचें कारणत्व स्वीकारण्यांत किंवा नाकारण्यांत विशेष अर्थच नाहीं. कार्यकारणभाव समजल्याचें मायात्मक समाधान पाहिजेच असलें तर परिस्थिति हीं 'कांहीं अंशी व एका अर्थानें' कारणीभूत होते असें म्हणून मोकळें व्हावें !

परिस्थिति कारणीभूत झाल्याचीं प्रो. वा. ब. पटवर्धन यांनीं दिलेलीं कांहीं उदाहरणें परीक्षणाकरितां घेऊं या. 'भोंवतालची देशरचना जशी असेल त्याप्रमाणें कवितेची चालचणूक असते' असें ते म्हणतात. आणि अर्थविवरणार्थ टीपेंत अशी पुस्ती जोडतात कीं, 'भूप्रदेश, देशरचना आणि हवापाणी यांचे गुणकर्मांचा कवींच्या मनावर परिणाम होतो तो, त्या त्या कवींच्या स्वभावाप्रमाणें किंवा मनःप्रकृतीप्रमाणें भिन्न भिन्न होतो.' या सिद्धान्ताच्या द्वारें प्रो. पटवर्धनांना असें का सांगावयाचें आहे, कीं नित्य दिसणाऱ्या हिरवळीमुळें स्वभावांत हिरवटपणा येईल, किंवा प्रदेशाच्या रुक्षतेमुळें स्वभावांत रुक्षता येईल किंवा उंच पर्वतांच्या सान्निध्यामुळें स्वभावांत उच्चत्व येईल, किंवा हिमालयाच्या जवळ राहिल्यानें स्वभावांत थंडपणा येईल ? माझा हा प्रश्न विडंबनात्मक वाटेल व थोडासा आहेहि. पण हें विडंबन थोडेंसें आवश्यक आहे, कारण पुष्कळ लोकांच्या मनांत या प्रश्नाच्या बाबतींत गोंधळ असतो तो दूर करण्याला असलें विडंबन आवश्यक आहे. प्रो. पटवर्धनच उपरिनिर्दिष्ट टीपेंत म्हणतात—

"रुक्ष प्रदेश, नीरस भूरचना, सदा बदलणारी हवा, धबधब्याचा आवाज वगैरे गोष्टींच्या साहचर्यामुळें वर्ड्स्वर्थ कवीचा स्वभाव सरळ,

साधा, गंभीर, न डगमगणारा, प्रसंगाला निमूटपणें तोंड देणारा, धिमा आणि नीरस किंवा विनोदशून्य झाला असें म्हणावयास जागा आहे. परंतु त्याच किंवा तशाच धबधब्यांच्या, विजांच्या वावटळींच्या झंझावातांच्या संगतीमुळें शेले, बायरन यांच्या वृत्ती उद्दाम, बेधडक मुसंडी मारणाऱ्या झाल्या असाव्या." ( काव्य आणि काव्योदय, पान २० )

वरील अवतरणांतील हेत्वाभास दाखविण्याकरितां एक कल्पित गोष्ट सांगणें सोईचें आहे. कांहीं मंडळी एका बागेंत गेली असतां त्यांना एक गुलाबाचें झाड दिसलें. त्यांतील एकानें गुलाबाचें एक मोठें फूल तोडून हुंगलें; दुसऱ्यानें एक अर्धविकासित फूल तोडून बटनहोलमध्यें घातलें; तिसऱ्यानें पाकळ्या तोडून टाकण्यास आरंभ केला; चवथ्यानें "या गुलाबाचें फ्रेंच नांव कायसेंसें आहे तें काय बरें?" असें म्हटलें व डोकें खाजविण्यास आरंभ केला; पांचव्यानें आमच्याकडे या फ्रेंच जातीचा गुलाब नाहीं, पण दुसऱ्या जातीचा आहे असें म्हटलें; सहाव्यानें आपल्या मुलीकरितां कांहीं फुलें तोडलीं; सातव्यानें आपल्या सहचरीला एक फूल तोडून दिलें व आठव्यानें गुलकंदाकरितां कांहीं फुलें तोडून हातरुमालांत घातलीं! नववा मागें मागें रेंगाळत होता त्याचें कारण असें कीं, त्याला आपल्या गत प्रियतमेच्या गुलाबी गालांची व हास्याची आठवण होऊन तो उदास झाला होता; आणि दहावा गालांतल्या गालांत हंसत तेथेंच उभा होता, कारण त्याला गडकऱ्यांच्या 'गुलाबी कोड्या'-ची आणि केशवकुमार अत्र्यांच्या 'प्रेमाच्या गुलकंदा'ची त्याच वेळीं आठवण झाली! आतां प्रस्तुत गुलाबाचें झाडच तेथें नसतें तर गुलाबाच्या संबंधीं या भिन्न वृत्ती व हीं भिन्न कर्में शक्यच नव्हतीं; तेव्हां 'गुलाबाचें झाड' ही परिस्थिति या सर्व कार्यांचें कारण आहे. आणि यावर कोणी जर आक्षेप घेऊं लागला कीं एकच कारण भिन्न कार्यें कशीं घडवून आणतें, तर प्रो. पटवर्धनांप्रमाणें 'स्वभावभेदामुळें' हें उत्तर सांगून मोकळें व्हावें! उपरिनिर्दिष्ट दहाहि कार्यें गुलाबाच्या झाडाच्या अभावीं अशक्य होतीं, तेव्हां या अर्थानें तें झाड 'कारण' या संज्ञेस पात्र असलें, तरी या झाडामुळें हीं कार्यें घडलीं या म्हणण्यापासून

कांहीं तरी बोध होतो का ? प्रो. पटवर्धनांनीं रुक्ष प्रदेश, नीरस भूरचना, वगैरेंना वर्डस्वर्थ कवीच्या व शैलेच्या स्वभावाचें एक कारण कल्पिलें आहे तें वरच्यासारखेंच एका अर्थानें खरेंहि आहे व बोधरहितहि आहे !

महा-काव्याच्या निर्मितीला परिस्थिति प्रतिकूल आहे या मुद्द्याचा आतां अधिक विस्तार न करतां अलीकडची अभिरुचिच बदलली आहे या मुद्द्याकडे वळूं या. अभिरुचि बदलली ती महाकाव्याच्या अनिष्पत्ती-मुळें बदलली, कीं अभिरुचि बदलली म्हणून महा-काव्यें निर्माण होत नाहींत, हा येथें प्रश्न उत्पन्न होईल. त्याचप्रमाणें लोकांना अभिरुचि नसली म्हणून विशिष्ट वाङ्मयाची निष्पत्ति तद्भक्तांकडून होण्याची अजीबात थांबते कीं काय, हाहि विचार करण्यासारखा प्रश्न आहे. पण पूर्वीच्या विवेचनाची दिशा ज्याला कळली आहे त्याला या मुद्द्यांचा विस्तार करण्याची जरूर भासणार नाहीं, या विचारानें सदर विस्तार टाळण्याचें ठरविलें आहे.

अलीकडे महाकाव्यें निर्माण न होण्याचें कारण म्हणजे निर्माण करण्यास समर्थ असलेली प्रतिभा अलीकडे दिसत नाहीं असें जर मी म्हटलें तर कांहीं लोक कुचेष्टेनें 'हें सांगायला तुम्ही नको' असें मनांत म्हणतील, कारण 'कार्यनिर्मितिसमर्थ कारण नाहीं, म्हणून कार्य नाहीं' असें म्हण-ण्यासारखेंच तें होईल. पण याशिवाय दुसरें उत्तर देणें कठीण आहे. कारण प्रतिभा कशी, केव्हां, कोणत्या कारणसंघाताच्या योगें, उत्पन्न होते हें जोंपर्यंत आपणास सांगतां येत नाहीं तोंपर्यंत या प्रश्नाचा उलगडा होणें शक्य नाहीं. तथापि निराश न होतां या प्रश्नाचा आपण जर विचार करूं लागलों तर पुढील कल्पना सुचतील, व त्या कांहींना ग्राह्य वाटतील.

महाकाव्यनिर्मितिसमर्थ प्रतिभा असल्यावर ती कोणत्याहि परिस्थितींत तसलें काव्य लिहील हें जरी खरें असलें, व तिच्या अभावीं कोणत्याहि परि-स्थितींत उत्तम महाकाव्य उत्पन्न होणार नाहीं हें जरी खरें असलें, (लांब-लचक व भुरळ घालणारी भाषा टाकून बोलायचें म्हणजे महाकाव्यें कशीं उत्पन्न होतात व कां होतात किंवा होत नाहींत हें जरी सांगतां येत नसलें ! ), तात्पर्य, प्रतिभेची निर्मिति कशी होते हें गूढ व दुर्ज्ञेय असलें, तरी

सद्यःकालीन सुसंगत समाजाची मनःस्थिति अलीकडे कशी झाली आहे याचें दिग्दर्शन करून अलीकडे महाकाव्यें निर्माण करण्यास समर्थ असलेली प्रतिभा कां दिसत नाहीं याचें एक कारण सुज्ञांच्या विचाराकरितां सुचवितां येईल. अलीकडे बाह्य परिस्थितीमध्यें सापेक्षतः स्थिरता व निश्चितता आली आहे, पण अंतःसृष्टि ढांसळत चालली आहे, आणि अतिशयोक्ति करून बोलायचें म्हणजे तेथें बेबंदशाही किंवा अराजकता माजूं पहाते आहे. जगाचा आपणांला अर्थ कळेनासा झाला आहे; अज्ञात लिपींत लिहिलेल्या सुप्रसिद्ध काव्याप्रमाणें जग हें आपणांस एका अर्थी सार्थ व रम्य असावेंसें वाटतें, पण हा अर्थ व हें रम्यत्व हीं अनुभवाला तर पटत नाहींत, तेव्हां या विश्वात्मक ग्रंथाकडे आपण केवळ साश्चर्य व कुतूहलयुक्त दृष्टीनें पहातों, पण त्यापासून समाधान, उत्साह, प्रसन्नता, स्फूर्ति यांचा लाभ मिळत नाहीं. His master's voice ('धन्याचा आवाज') या नांवाच्या फोनोग्राफच्या जाहिरातींत एक कुत्रा दाखवितात, त्याला आपल्या धन्याचा आवाज तर ओळखतो, पण तो कोठून कसा येतो हें त्याला समजत नाहीं, व खरोखरचा धनी बोलतो आहे कीं हा भ्रम आहे असा त्याला प्रश्न पडलेला दिसतो, त्याप्रमाणेंच आपली स्थिति झाली आहे; म्हणजे जगाकडे पाहून व त्यांतील 'ध्वनि' ऐकून आपल्या धन्याचा आवाज आपणाला ओळखीच्यासारखा तर वाटतो, पण निश्चय मात्र कांहीं एक करवत नाहीं, अशी आपली स्थिति झाली आहे !

अलीकडे धर्माच्या बाबतींत काय किंवा राजकीय व इतर बाबतींत काय, मतामतांचा गलबला आहे; सर्व कल्पना संशयास्पद झाल्या आहेत; कोणतीहि अशी नाहीं कीं तिला जोराचा धक्का मिळालेला नाहीं. अशा मनःस्थितींत कशाचा विशेष राग-लोभ नसतो, कशाबद्दल विशेष अगत्य किंवा उत्साह वाटत नाहीं, कांहींहि विशेष आदरणीय व पूज्य वाटत नाहीं. परंपरेचे संस्कार टिकले आहेत, पण ते पुसट होत चालले आहेत. नवीन संस्कार कोणते करावयाचे हेंच निश्चित नसल्यामुळें कोणालाहि त्यांचें अगत्य नाहीं. थोडक्यांत सांगायचें म्हणजे अलीकडच्या शास्त्रीय युगांत बाह्य परिस्थितीमध्यें सापेक्षतः स्थिरता, पण अंतःसृष्टीमध्यें

अस्थिरता व अराजकता उत्पन्न झाली आहे. अशा मनःस्थितींत कोठल्याहि क्षेत्रांत मोठा पराक्रम कसा होणार ?

सध्यां आपणाला लहान लहान कर्तव्यें, लहान लहान प्रश्न, लहान लहान सौंदर्यें दिसतात, पण विश्वव्यापक कर्तव्यें, समुद्रगंभीर प्रश्न व विराट्स्वरूपी सौंदर्यें कल्पनेलाहि अगम्य झालीं आहेत; कारण धर्मावरचीच नव्हे तर नीती-वरची श्रद्धा उडालेली आहे, आधिभौतिक शास्त्रांवरची उडालेली आहे, आणि सौंदर्य-विषयक औचित्यांवरचीहि उडालेली आहे. पूर्वीच्या श्रद्धा, निष्ठा, भावना, कल्पना पार गेल्या असें म्हणण्यांत अतिशयोक्ति असेल; पण त्या जात चालल्या आहेत यांत काडीमात्र कांहीं खोटें नाहीं. ज्या भाव-भावनांच्या व विचार-विकारांच्या प्रेरणांनीं रामायणांतील व महाभारतांतील व्यक्तींना त्या त्या प्रसंगीं तें तें मानण्यास व बोलण्यास व करण्यास लावलें, त्या भाव-भावना व ते विचार-विकार आतां जीर्ण होत चालले आहेत. रामरावणांच्यासारखें युद्ध यापुढें शक्य दिसत नाहीं, कारण 'देव' नष्ट होत चालले आहेत व राक्षसांची जातहि नाश पावते आहे. आतां आपणांला सर्वत्र 'मानव' दिसत आहेत. गेल्या महायुद्धांत जर्मन लोकांना इंग्लिश लोक 'हूण' वगैरे शिव्या व्याख्यानांत व वर्तमानपत्रांत देत असत, पण हें सर्व ओंठावरचें होतें; पोटांत इंग्लिश लोक ओळखून होत कीं जर्मन लोक आपल्यासारखेच आहेत ! तसेंच हल्लींच्या चालू सत्याग्रहयुद्धांत देव-दानवांच्या युद्धाविषयीं भारत-रामायणादिकांत वर्णन केलेला प्रकार दृष्टीस पडत नाहीं, व पडणार नाहीं. कारण गांधी हे इंग्रजांचा द्वेष करूं नका असें स्पष्ट सांगत आहेत व इंग्रजहि गांधींना शिव्या देतांना आढळत नाहींत. हिंदुमुसलमानांचे दंगे अजून होतात, पण रामदासांना किंवा शिवाजीला जें वाटत होतें तें आपणांला वाटत आहे काय ? नीतीच्या बाबतींत हेंच आणि रसिकत्वाच्या बाबतींतहि तेंच. '**नागडा पंथ**' जर्मनीमध्यें निघालेला वर्तमानपत्रांत आपण वाचतों, पण त्याबद्दल विशेष राग येत नाहीं. त्याचप्रमाणें प्रो. आर्. डी. कर्वे यांनीं 'समाज-स्वास्थ्य' या मासिकावर नग्नप्राय स्त्रीचें चित्र छापलें, किंवा 'रत्नाकरा'नें "ओलेती" हें चित्र छापलें, तर त्याबद्दल आपण विशेष त्वेषानें बोलत नाहीं. मतभेदाचा

हा प्रश्न आहे असें आपण समजतों व प्रश्न तेथेंच सोडून देतों, झालें! सध्यांच्या काळीं आपली अशी मनःस्थिति झाली आहे कीं आपली कशावर विशेष उत्कट श्रद्धा नाहीं; निष्ठा नाहीं; नित्यत्वानें किंवा निश्चयानें आदरणीय किंवा पूज्य असें विशेष कांहीं राहिलें नाहीं; भूतकाळावर श्रद्धा नाहीं; भविष्यकाळावर विश्वास नाहीं; वर्तमानकाळांत समाधान नाहीं; निश्चित सिद्धान्त नाहींत, निश्चित आकांक्षा व ध्येयें नाहींत; निश्चित स्नेह वगैरे नाहीं; निश्चयानें मनें आनंदविणारीं किंवा दुखविणारीं स्थळें किंवा कारणें नाहींत; निश्चयानें सर्वांना जोडणारीं किंवा तोडणारीं सत्कर्में किंवा दुष्कर्में नाहींत; तर सर्वत्र अनिश्चय, संशय, ढिलेपणा, गुळमुळीतपणा व चालढकलपणा दिसत आहे!

हें मानसिक पृथक्करण सर्व व्यक्तींना पूर्णपणें लागू पडणार नाहीं. पण ज्या सुशिक्षित वर्गांतून महाकाव्यें निर्माण करणारे किंवा वाचणारे निघावयाचे त्या वर्गांतील बहुतेकांना वरील वर्णन कमीअधिक मानानें लागू पडेल असें वाटतें. हें जर खरें असेल,—ज्या उच्च, व्यापक, सोत्साह व आत्मप्रत्ययपूर्ण वृत्तीनें व दृष्टीनें पाहिल्याशिवाय महाकाव्याची निष्पत्ति होऊं शकत नाहीं ती दृष्टि अलीकडे फारशी दिसत नाहीं हें जर मान्य असेल—तर महाकाव्यांच्या निर्मितीचे प्रयत्न कां होत नाहींत व झाल्यास ते यशस्वी कां होत नाहींत हें थोडेंसें कळेल. अलौकिक ' प्रतिभा ' हल्लींच्या युगांतहि हल्लींच्या युगाला रुचेल व पटेल असें महाकाव्य रचील यांत शंकाच नाहीं; पण प्रतिभेचा प्रश्न गूढ असल्यामुळें त्याचा विचार बाजूला ठेवून सामान्यदृष्टीनें हें विवेचन केलें आहे. महाराष्ट्रांतील हल्लींच्या कवींना, कादंबरीकारांना, नाटककारांना, निबंधकारांना, तत्त्वज्ञांना सामान्य दर्जाचीं लहान लहान सत्यें व सौन्दर्यें दिसतात व तीं त्यांना सांगावींशीं वाटतात. आणि म्हणूनच काव्यक्षेत्रापुरतें पहावयाचें म्हणजे भावगीतादि लघुकाव्यप्रकार अलीकडे प्राचुर्यानें दिसत आहेत. यांत अनुचित असें कांहींच नाहीं. उलट उच्चतर, गंभीरतर व व्यापकतर सत्याकडे व सौन्दर्याकडे जाण्याचा हा एक मार्ग आहे व तो अभिनंदनीय आहे.

याच न्यायानें प्रस्तुत '**निर्झरिणी**' ही अभिनंदनीय आहे. ध्येयदृष्ट्या

तिचें क्षेत्र व तिचें गांभीर्य हीं मर्यादित स्वरूपाचीं असतील; पण महाराष्ट्रांतील सर्व कवि, कादंबरीकार, वगैरेंचें असेंच आहे. व्यास—वाल्मीकि केव्हां निघतील तेव्हां निघोत, सध्यां आपणांस लघुकाव्यांवरच संतुष्ट राहिलें पाहिजे. असो. आधुनिक काव्यांविषयीं सामान्य स्वरूपाचें इतकें विवेचन केल्यावर प्रस्तुत पुस्तकांतील कवितांबद्दल व कवि—कवयित्रींबद्दल तुलनात्मक व गुणदोषविवेचक कांहीं विचार (कारण सर्वांगीण परीक्षण करण्याचें मी योजिलेलेंच नाहीं,)—केवळ कांहीं विचार मांडावयाचें योजिलें आहे, तेव्हां हे विचार वाचकांपुढें मांडावयास आतां आरंभ करतों.

या ग्रंथांत युवराजांच्या ३१ कविता असून युवराज्ञींच्या २० कविता आहेत असें मागें म्हटलें. पण कर्तृत्व स्वतंत्र असलें तरी एकमेकांच्या सहवासाचा, सहविचारांचा व सहानुभवांचा एकमेकांवर अप्रत्यक्ष, पण प्रबळ असा, परिणाम झाला असलाच पाहिजे. त्याशिवाय दुसरें असें कीं आपआपल्या कविता पुऱ्या किंवा अर्धवटदेखील लिहून झाल्यावर उभयतांनीं एकमेकांना वाचून दाखविल्या आहेत व कांहीं ठिकाणीं प्रेमादरयुक्त सहकारितेनें सुधारलेल्या आहेत हें मला ठाऊक आहे. अशा रीतीनें द्वैतांत अद्वैत असलेल्या निरनिराळ्या कवितांखालीं '**स. र. पंतसचिव**' व '**सौ. सरोजिनीबाई पंतसचिव**' अशा सह्या दिल्या नसत्या तरी पांढऱ्या व तांबड्या कापडाच्या पट्ट्यांनीं गुंफलेल्या गोफांत ज्याप्रमाणें अनेक पदर एकजीव झालेले असले तरीदेखील त्यांचें स्वतंत्र अस्तित्व रंगभेदानें भासमान होतेंच, त्याप्रमाणेंच येथेंहि झालें असतें. एका वाक्यांत सांगावयाचें म्हणजे भाऊसाहेबांची कविता, ('युवराज' न म्हणतां यापुढें आपण 'भाऊसाहेब' म्हणूं या,) पुरुषजातीचे कांहीं विशिष्ट गुणधर्म दाखविते, तर माईसाहेबांची (युवराज्ञींची) कविता स्त्री-जातीचे कांहीं विशिष्ट गुणधर्म दाखविते !

उदाहरणार्थ, माईसाहेब या 'विमला' नांवाच्या आपल्या लहान कन्यकेला उद्देशून एक कविता लिहितात, तर भाऊसाहेब 'गवाक्षांतील सुंदरी'स उद्देशून एक कविता लिहितात ! माईसाहेबांना प्रेमाचें वावडें आहे किंवा प्रेमाचा विटाळ वाटतो अशांतला भाग नाहीं; कारण त्या हृदय चोरण्याच्या

‘ **चोरी** ’बद्दल किंवा ‘ **प्रेमाच्या तीन अवस्थां** ’बद्दल कविता लिहितांना आढळतातच. त्याचप्रमाणें प्रेमी जनांच्या लाड-भांडणांबद्दल त्यांनीं एक सुंदर विनोदी कविता (‘ **विकल्प** ’ नांवाची ) लिहिलेली आहे व ‘ खरा तो प्रेमा ना धरी लोभ मनीं ’ या मथळ्याच्या कवितेंतहि ‘ प्रेम ’ या विषयाला त्यांनीं स्पर्श केला आहे. पण त्यांच्या या कविता सामान्य दर्जाच्या व ठराविक आणि सांकेतिक नमुन्याच्या आहेत. त्यांच्या प्रेमविषयक कवितांचें वैशिष्टय पहावयाचें असलें तर शोक-रसाचा आस्वाद घेण्यास आपण तयार झालें पाहिजे. नुसतें पुढील मथळ्यांकडेच जरा पाहिलें तर माझ्या म्हणण्याचा भावार्थ ध्यानांत येईल. ‘ विरहिणी राधा ’; ‘ द्रौपदीचा धांवा ’; ‘ हांक ’; ‘ जानकी ! वेड तुज लागे ’; ‘ अनारकळी ’; इत्यादि इत्यादि. या कविता इतक्या करुणरसपूर्ण आहेत कीं अशाच कविता त्यांना कां सुचाव्यात हें मला थोडेंसें कोडें आहे. ‘ गुराखीण ’ या कवितेंत शृंगाररसाचा थोडा वास आहे पण हा वासदेखील—

**हें सर्व स्मरुनी हृदय भरोनी येतें ।**
**परि तुला निष्ठुरा ! कांहिं न त्याचें वाटे ॥**
**हे पशुपक्षी घरिं निजतिल आनंदानें ।**
**तुजविणें द्यावि मज काळझोंप देवानें ॥**

—अशा प्रकारच्या शोकसूचनांनीं दूषित झाला आहे. माईसाहेब ‘ **प्रेमाच्या तीन अवस्थां** ’चें वर्णन करूं पहातात, पण ही कविता विशेष खोल नाहीं व—

**देहाच्या जैशा तीन अवस्था असती ।**
**तैशाच जगामधिं प्रेमाच्याही दिसती ॥**

—या आरंभींच्या चरणांनीं व पदाच्या चालीनें खिन्नतेचीच छाया पुढील आनंदपूर्ण विषयावर व वर्णनावर प्रबळतेनें पाडलेली आहे.

माईसाहेबांचें ‘ प्रेमविषयक ’कवित्व निष्कपट लहान मुलें यांच्याशीं लाडिक-पणें बोलण्यांत गुंगलेलें असतें, किंवा पुराणेतिहासांत वर्णिलेल्या आपत्ति-

ग्रस्त तरुण स्त्रियांशीं गुजगोष्टी बोलून व त्यांच्याशीं समरस होऊन त्यांच्या शोकास ' श्लोकत्व ' देण्यांत गुंतलेलें असतें, असें म्हटलें तर भाऊसाहेबांच्या प्रेमविषयक कवित्वाविषयीं असें म्हणतां येईल कीं तें बाहेरून किती जरी रंगेल दिसलें, तरी केवळ शृंगारांत तें विशेष रममाण होऊं शकत नाहीं. **' गवाक्षांतील सुंदरी '**स उद्देशून जरी ते शाहिरी करूं लागले, व—

**पायापाशीं बसे शाहिर**
**हृद्वीणेवरि धरितो सूर**
**राग आळवी तुझा निरंतर**
**बोल त्यांशि तूं मधूर वचनीं**
**मज सांग सांग तव काय मनीं ?**

असें किती जरी आळवूं लागले, तरी ते औचित्य-मर्यादा कधीं सोडीत नाहींत व कल्पना-निर्मित ' गवाक्षांतील सुंदरी ' तर रुष्टच रहाते व अबोला सोडीतच नाहीं ! भाऊसाहेबांचें कवित्व शृंगारिक वर्णनांत रमतें, पण तत्त्वज्ञानाची व कलाभिरुचीची त्यावर इतकी दाट छाया पडते कीं त्याचें मूळ स्वरूप पार बदलून जातें. उदाहरणार्थ, ते ' पर-पुरुषा 'शीं रममाण होऊं पहाणाऱ्या अभिसारिकेचें वर्णन करतात, पण हा ' पर-पुरुष ' म्हणजे परमात्मा, व अभिसारिका म्हणजे जीवात्मा, असा अर्थ पहिल्या-पासूनच इतका स्पष्ट असतो कीं, अध्यात्मानें घेतलेलें शृंगाराचें सोंग ( नरसिंह चिंतामण केळकर यांच्या काव्यानंद-विषयक उपपत्तीला अनुसरून बोलावयाचें म्हणजे ) दोन भूमिकांचा एकसमयावच्छेदेंकरून अनुभव करून देतें व म्हणून विशेष प्रकारच्या सात्त्विक रसाचा तेथें आस्वाद मिळूं शकतो. ' शिल्पकार ' व ' रति ' या दोन कवितांत शृंगार डोकावतो, पण तो भाऊसाहेबांच्या शृंगाररसप्रभुत्वापेक्षां त्यांच्या कलाभिरुचीलाच अधिक व्यक्त स्वरूप देतो. ' पिग्मेलिअन ' नांवाच्या एका शिल्पकारानें एका सुंदर स्त्रीचा पुतळा पूर्णपणें निर्माण केला तेव्हां तो आपल्या कल्पनाकृतीशीं इतका समरस झाला होता व तो पुतळा इतका सुंदर झाला होता कीं त्या पुतळ्यावरच तो शिल्पकार आशक झाला, अशा आशयाची एक ग्रीक पौरा-

णिक कथा आहे; तिला अनुलक्षून ' शिल्पकार ' ही कविता रचलेली आहे. ' रति ' ही कवितादेखील अशाच एका कलानिपुण शिल्पकाराविषयींची आहे. पण यांतील गोष्ट काल्पनिक नसून खरीखुरी घडलेली आहे. इटली देशामध्यें कॅनोवा ( Canova ) नांवाचा एक अत्यंत कलाकुशल व सुप्रसिद्ध मूर्तिकार होता. त्याला ' विजयिनी रति ' ( 'Victorious Venus') नांवाचा पुतळा तयार करावयाचा होता व या पुतळ्याकरितां नेपोलियन बोनापार्टची बहीण पॉलिन बॉर्गीज ( Pauline Borghese ) ही सौंदर्याचा एक जिवंत पुतळा म्हणून त्याच्यापुढें अर्धनग्नावस्थेंत बसली होती व तिच्याकडे पाहून पुतळा बनविण्याचें काम तो करीत होता. ' विजयिनी रति ' या रूपानें आपलें सौंदर्य अजरामर कीर्ति पावेल या अभिमानानें व मूर्तिकलाविलासाला साहाय्यक व्हावें या हेतूनें त्या उच्चकुलीन स्त्रीनें मूर्तिकारापुढें ' सौंदर्यमूर्ति ' म्हणून बसण्याचें कबूल केलें होतें. हें काम चालू झाल्यावर कालान्तरानें ' कॅनोवा 'चें तिच्यावर प्रेम बसलें व तिचेंहि त्याच्यावर बसूं लागलें. अर्थात् पुतळा घडविण्याचें काम मंदाईनें होऊं लागलें ! कॅनोवा आपलें काम बाजूला सारून तिच्याकडेच वारंवार पहात राहूं लागला व एक दिवस तर ती थंडीनें थोडीशी व्याकुळ झाली आहे व तो तिच्याकडे टक लावून एकसारखा पहात आहे असा देखावा दिसूं लागला ! या प्रसंगाला अनुलक्षून भाऊसाहेबांनीं

**घडवीं शिल्पिवरा !**
**आतां लाविशि कां उशिरा ? ॥**

ही कविता लिहिली आहे. उगीच स्वस्थ बसूं नकोस, मूर्ति घडविण्याचें काम चालव, उशीर कां लावतोस, असा या ध्रुपदाचा अर्थ आहे. पण कित्येकांना मूळ संदर्भ ठाऊक नसल्यामुळें **' आतां लाविशि कां उशिरा ? '** या चरणांत विपरीत अर्थ भासूं लागला आणि अश्लीलत्व दिसून आलें. हा त्यांचा दोष नव्हे, तर एका अर्थी भाऊसाहेबांचाच हा अप्रत्यक्ष दोष आहे; कारण **' मनोरमा '** मासिकांत ज्या वेळीं ही कविता प्रसिद्ध झाली त्या वेळींच जर संदर्भ दिला गेला असता तर गैरसमजाला

कारणच उरलें नसतें. भाऊसाहेबांनीं संदर्भ लिहून पाठविला होता, पण तो प्रकाशित होण्याचें राहून गेलें. ज्यांचा गैरसमज झाला त्यांना संदर्भ कळता तर 'आतां, लाविशि कां उशिरा' या चरणाचा भलताच अर्थ झाला नसता व पुढील चरणांचाहि सरळ अर्थ ध्यानांत आला असता; आणि कलाविलासाचा नाद असलेल्या स्त्रीपुरुषांचा कलाविलासाच्याच दृष्टीनें जरी संबंध आला, तरी पुढें त्याचें रूपान्तर होतें व दोघेंहि कलाध्येया-पासून च्युत होण्याचा संभव असतो ही गोष्ट नीटपणें प्रतीत झाली असती व भाऊसाहेबांनीं ज्या देखाव्याचें वर्णन केलें आहे त्याचें मर्म कळलें असतें. विशिष्ट प्रकारच्या प्रेमाचें वर्णन जेव्हां कवि करतो तेव्हां तो त्या प्रेमाची तरफदारी करीत असतो असें कांहींजणांना वाटतें. यथार्थ वर्णनाचें कलाकौशल्य पहावयाचें सोडून कांहीं लोक कवीवर उप-देशकाचा 'आरोप' करतात व त्यानें वर्णन केलें असेल त्याप्रमाणें वागण्यास तो सांगत आहे अशी कल्पना करून घेऊन अनीतिसंवर्धनाचा गंभीरतर असा दुसरा एक 'आरोप' त्याच्यावर करण्यांत येतो! पण हे आरोप अज्ञानजन्य आहेत हें उघड आहे. उदाहरणार्थ, शूर व रुबाबदार, पण दुष्ट व कामुक, अशा 'मानाजीरावां'चें वर्णन करतांना भाऊसाहेब म्हणतातः—

**गोड बोलुनी साखर पेरी**
**स्रवते मधु तन्मुखांतुनी!**
**दृष्टी मोहक, हृदय भेदिते**
**स्नेहा वरिते जरि वरुनी॥**
**अनेक नारी भुलवी, गाहिरी**
**नजरेच्या खर बाणांनीं॥**
**खोड लागली भलती याला**
**फसवी नारी शब्दांनीं।**
**शूरत्वाची, दातृत्वाची**
**मूर्ति खरोखर हा राणा।**

स्त्रिया भुलविणें नाद लागला—
नव्हे, जाहला हा बाणा ! ॥
सरशीवरतीं सरशी मिळतां
खोड वाढली त्या न मिती ।
स्त्री-शीलांना करीत भक्षण
राक्षस चाले या रीती ॥

आतां मानाजीरावाचें असें वर्णन भाऊसाहेबांनीं केलें म्हणजे त्याचें शील त्यांना अभिमत आहे असें कोणीच म्हणणार नाहीं. हीच गोष्ट ' रति ' या कवितलाहि लागू पडते. वास्तविक या मुद्द्याचा एवढादेखील विस्तार करण्याचें कारण नव्हतें, पण कांहींजणांनीं वर्तमानपत्रांत गैर-समजामुळें कांहीं आक्षेप घेतले होते ते नुक्तेच वाचण्यांत आल्यामुळें एवढा विस्तार झाला. या विषयाचा निरोप घेण्यापूर्वी कंसांत अशी एक गोष्ट सर्व कवींना, नाटककारांना व ( माझ्यासकट ) सर्व कादंबरीकारांना सुचवावीशी वाटते कीं, ' प्रेम ' हा विषयच भ्रम उत्पन्न करणारा आहे, तेव्हां त्याचें कलादृष्टीनेंहि वर्णन करतांना सर्वांनीं सावध असावें; नाहीं तर मूर्तिकार ' कॅनोवा 'प्रमाणें आपल्या आदर्शमूर्तीवरच आपलें मन जडाव-याचें आणि मर्यादातिक्रम करणाऱ्या नायक-नायिकेचें कलादृष्टीनें वर्णन करण्याच्या भरांत आपणच एखाद वेळेस आपल्या शब्दसृष्टींत मर्यादाति-क्रम करावयाचे ! उदाहरणार्थ, भाऊसाहेबांचें एके ठिकाणीं थोडेंसें असेंच झालें आहे. ' तऱ्हा वेगळी या प्रेमाची ' या कवितेंत ' स्मर-राजाचे नवोनव खेळ ' सुंदर शब्दांच्या द्वारें वर्णन करतांना—

मधु वदनांतिल लुटुनी लोचट हंसत बघत राही ।
जुलुम किती हा अधरांवरतीं राग मला येई ॥

असें वर्णन केलें आहे तें ठीक आहे. पण पुढें लगेच—

घेइ पटापट किती चुंबनें माझ्या वदनाचीं ।
गणती कसली अगणित प्रेमीं होइ चुंबनांची ॥

अशा प्रकारचें जें वर्णन आहे तें केवळ ध्वनिरूपानेंच असतें व अनुक्त रहातें, तर बरें झालें असतें असें मला वाटतें व भाऊसाहेबांनाहि हें मान्य होईल अशी माझी कल्पना आहे.

भाऊसाहेबांच्या व माईसाहेबांच्या प्रेमविषयक कवितांचा थोडासा विचार केल्यानंतर इतर कवितांकडे आतां वळूं या. या कवितांचे बाबतीं-तहि दोघांच्या कवितांतील भेद मागें म्हटल्याप्रमाणें स्पष्ट आहे व त्यांच्या त्यांच्या जातीला सहज आहे. माईसाहेबांच्या कवितांत विद्वत्वापेक्षां कोमल भावना अधिक मिळतील, गहन विचारांपेक्षां सोप्या व सुंदर कल्पनांचा विलास अधिक दिसेल, विषयांच्या विविधतेपेक्षां विषयांचें हृदयस्पर्शित्व अधिक भासमान होईल, भाषाप्रभुत्वापेक्षां व कलाकुसरीपेक्षां भाषेचें **सहजरम्यत्व व सहजगम्यत्व** हीं अधिक प्रत्ययाला येतील. त्या ‘ज्ञाना’वर कविता लिहितात, पण—

**मज दिलें कशाला व्यर्थ ईश्वरा ज्ञान।**
**मम सौख्यामध्यें पडली त्यानें वाण॥**

असें त्या आरंभींच म्हणतात, आणि अखेरीस—

**प्रभु नको दुजें मज कांहीं तव वरदान।**
**दे शान्ती अथवा गाढ गाढ अज्ञान॥**

अशी ईश्वराजवळ प्रार्थना करतात. (प्रेमाविषयीं बोलतांना काय, किंवा ‘ज्ञाना’विषयीं बोलतांना काय, अशी ही निराशात्मक छटा कां दिसावी हें समजत नाहीं, पण दिसते खरी.) भाऊसाहेबांना ज्ञानाचे विविध रंग प्रिय आहेत. त्यांना सृष्टीचें हृदय जाणावेंसें वाटतें, ‘रवीन्द्रनाथा’सारख्या कवीश्वराशीं परिचय करावासा वाटतो, कलानिपुण शिल्पकारांच्या व चित्रकारांच्या कृतींमध्यें व चरित्रां-मध्यें ते रममाण होतात, समाधिस्थ व आत्मानंद-निमग्न ‘योगीन्द्रां’च्या गुहांत त्यांना जावेंसें वाटतें, ‘त्यागमूर्ति’ गौतमबुद्धाची वृत्ति त्यांना बुद्धीनें जाणावीशी व अंगीं बाणावीशी वाटते, व देहाचा विसर पडून

श्रुति-वर्णित ‘पर-पुरुषां’शीं रममाण होऊन मुक्तहि व्हावेंसें वाटतें! माईसाहेब ‘ईशस्मरण’ करतात, पण तें साध्याभोळ्या भक्तिभावाचें असतें.

**असो मम मुखीं तुझें सतत नाम तारावया।**
**घडो न तव विस्मृती जरिहि काल ये न्यावया॥**

असें त्या म्हणतात, तर भाऊसाहेब—

**मात्रा-यमकांनीं जखडीलें देवा!**
**रूप तुझें गाया येत नाहीं॥**

अशा अलंकारिक भाषेंत, किंवा ‘त्यागमूर्ति,’ ‘निसर्गसत्कार’ ‘दुर्दिन’ इत्यादि कवितांच्या द्वारें विदग्ध ध्वनि-रूपानें, आपली मुमुक्षा व्यक्त करतात.

भाषेच्या दृष्टीनें पहातांदेखील उभयतांच्या कवितांतील गुणभेद वरीलप्रमाणें दृष्टोत्पत्तीस येतात. माईसाहेबांचे शब्द साधे, समास वगैरे फारसे नाहींत, अलंकार फार थोडे, दाखले नित्यपरिचयाचे व पदांच्या चाली जुन्या व सोप्या; भाऊसाहेबांचे शब्द सापेक्षतः अधिक सुसंस्कृत व अधिक समासयुक्त, त्यांची शैली अधिक अलंकारमंडित व विद्वत्व-सूचक, त्यांचे दाखले अधिक ग्रंथदृष्ट व अपरिचित, त्यांच्या अर्थांत अधिक गंभीरता व विचारपरिप्लुतता, आणि वृत्तांत अधिक विविधता व आधुनिकता; पण वाचकांच्या किंवा श्रोत्यांच्या मनावर होणाऱ्या परिणामाकडे पहातां माईसाहेबांचीच भाषा (आपल्या मर्यादित क्षेत्रा-पुरती का होईना) अधिक मनोरम आहे असें म्हणावेंसें वाटतें, आणि दुष्यन्तानें शकुन्तलेला पाहिल्यावर जे उद्गार काढले (**दूरीकृताःखलु गुणैरुद्यानलता वनलताभिः**) ते उद्गार ओंठावर येतात. उदाहरणार्थ, माईसाहेबांची ‘शिवपूजा’ ही कविता व भाऊसाहेबांची ‘**प्रतापगडच्या देवीपाशीं**’ ही कविता यांची तुलना करून पहावी. माईसाहेबांच्या कवितांत सांकेतिक व्याकरणाचे दोष सांपडतात, पण ते त्यांच्या शुद्ध भावनेच्या गंगाप्रवाहांत लुप्त होतात. उदाहरणार्थ, द्रौपदीवस्त्रहरणाचे प्रसंगीं द्रौपदी कृष्णाचा धांवा करते तेव्हां ती म्हणते,

**ह्या व्यसनिं मला, नाहीं दुसरा असरा**
**प्रेमाच्या वसना पसरा।**
**या जगतिं हरी, कोणि न आतां वाली**
**ये धांवत, ये वनमाली॥** इत्यादि इत्यादि.

या कवितेंतील ‘ असरा ’ शब्द शुद्धलेखनाच्या दृष्टीनें सदोष वाटतो, पण या करुणरसप्रधान सुंदर कवितेंत शुद्धलेखनाचे सांकेतिक नियम किंचित् बाजूला सारले गेले तरी ते क्षम्यच वाटतात. पण भाऊसाहेबांचे असले दोष क्षम्य वाटत नाहींत. उदाहरणार्थ, ‘ भूपर्ता खरे ते ’ या चालीवरच्या ‘ निसर्गसत्कार ’ या कवितेंत चांगल्या कल्पना आहेत, पण तिच्यांतील पुढें दिलेला यतिभंगाचा दोष तेवढा क्षम्य वाटत नाहीं.

**सृष्टीचे पाहत नानाविध हे खेळ।**
**तूं असाच ना घा-लविशी सारा वेळ॥**

त्याप्रमाणेंच भाऊसाहेबांच्या ‘ **सात रंग** ’ या सुंदर कवितेंत भाषाविलास व कल्पनाविलास उत्तम आहेत, पण काय असेल तें असो, पुढें दाखविलेला एका कडव्यांतील वृत्तभंग-दोष अक्षम्यच वाटतो.

**मनास शान्तिदायिनी। प्रभा कुठें प्रमोदिनी?।**
**प्रसादरम्य सारसीं। स्फूर्ति-पूर्ण मानसीं॥**
**जगांत अमृत-वर्षिणी। प्रीति कुठें राहते। (राहे ते?)**
**एक चक्रवाककुलीं। कुठें न अन्य राहिली॥**

त्याचप्रमाणें ‘ **कल्पना-सृष्टि** ’ या कवितेंत आरंभीं भाषाप्रभुत्व जरी दिसलें व प्रतिभाशालित्व आणि मार्मिकत्व हीं जरी दिसलीं, किंबहुना हीं दिसतात म्हणूनच, सहाव्या कडव्यांतील छंदोदोष ( ‘ निपजतो ’ —‘ निपजे तो ’ असें तर नाहीं ? ), त्याचप्रमाणें शेवटल्या कडव्यांतील अस्पष्टार्थत्वदोष, हे रसिकाच्या काव्यानंदाला हानिकारकच वाटतात. माईसाहेबांच्या कवितांत असले दोष सापेक्षतः कमी सांपडतील.

अशा रीतीनें माईसाहेबांची भाषा कांहीं बाबतींत सरस ठरली तरी तिचें क्षेत्र व तिचा आवांका हीं मर्यादित आहेत, हें ध्यानांत धरलें पाहिजे. माई-

साहेबांना द्रौपदीच्या दुर्दशेसारख्या विषयावर उत्तम कविता लिहितां येतील; पण भाऊसाहेबांनीं पाटलाच्या सुनेचें जें वर्णन केलें आहे किंवा मानाजीरावाचें पुढें दिलेलें वर्णन जें केलें आहे तें त्यांना साधणें कठीण दिसतें.

**अरबी घोडा, रुबाब मोठा**
**दौडत जाई चौफेर ।**
**धन्यास घेउन, करीत फुरफुर,**
**पुच्छ उभारित, अश्ववर ॥**
**जवान सुंदर युवक शोभला**
**घोड्यावरतीं सरदार ।**
**नोक-झोक तरि पाहुनि घ्यावा**
**छाती दिसते भरदार ॥**
**घोडा फेंकी धूळीचा तो**
**लोट चालला अस्मानीं ।**
**कटिशीं शोभे खड्गलता जी,**
**रक्षण करिते पदोपदीं ॥**
**डोइस बांधी फेटा, शमला**
**सोडियला निज पाठीला ।**
**चमक दृष्टिची जहर भासली**
**हृदयान्तरिं पर-नारीला ॥**

त्याचप्रमाणें पहिल्याच कवितेंत भाऊसाहेबांनीं भागीरथीचें जें वर्णन केलें आहे, तसेंच ' प्रशान्त प्रदेश ' या कवितेंत जें वर्णन आलेलें आहे, तेंहि माईसाहेबांच्या क्षेत्राच्या बाहेरचें दिसतें. तसेंच—

**धूम-गूढ भावना प्रदीप्त-चित्त-अन्तरीं**
**व्यापिती मनोंगणा मूर्ति रचित भास्वरा ।**
**प्रबळ हृदय-कंपनें व्यक्तरूप इच्छिलें**
**स्फूर्तिरूप ईश्वरें शब्दचित्र रेखिलें ॥**

इत्यादि प्रकारची किंचित् तात्त्विक व गूढार्थक जी कविता आहे ती, किंवा '**जीवन्मांगल्य**' नांवाची असल्याच प्रकारची जी कविता आहे ती, भाऊसाहेबांनींच करावी असें उभयतांच्या उपलब्ध कवितांवरून तरी अनुमानितां येतें.

असो. उभयतांमध्यें तुलना करण्यांत अधिक वेळ खर्च करण्यांत विशेष अर्थ नाहीं, कारण एक तर असें कीं कोणीहि अधिक सरस-नीरस ठरलें तरी समरस झालेल्या या प्रेमळ दांपत्याला सुखदुःख बहुतेक सम-समानच असणार! दुसरें कारण असें कीं सरस-नीरस ठरविणेंच कठीण आहे. उषा अधिक चांगली का सूर्य, हें कोण सांगेल? चंद्राची सौम्य व किंचित् उदास कला अधिक चांगली, का इन्द्रधनुष्याचा अनेकरंगी पसारा चांगला हें कोण कसें ठरविणार? तसेंच जाई का गुलाब, कोकिळा का गरुड, सत्कीर्ति का सत्पराक्रम, बहीण का भाऊ, माता का पिता, यांमध्यें निवड कोण कशी करणार? निवड केलीच पाहिजे असा कोणी आग्रह केल्यास, वरील दाखल्यांपैकीं शेवटल्याचा आधार घेऊन असें उत्तर देतां येईल कीं आईबापांपेक्षां त्यांचीं अपत्यें जशीं, इतरांना काय किंवा त्यांनाहि काय, अधिक प्रिय असतात, त्याप्रमाणेंच उभय-तांचीं काव्यापत्यें आम्हांला अधिक प्रिय आहेत व त्यांचीं मातापितरें अधिक आदरणीय व वंद्य आहेत!

या काव्यापत्यांचें प्रथम प्रेमादरपूर्वक कौतुक केल्यानंतर महा-राष्ट्रांतील काव्यसृष्टीमध्यें यांचें स्थान कोणतें या प्रश्नाकडे वळूं या. लोकमत अजमावण्याकरितां मतांची शिरगणती केली तर या राजकवींना कविसाम्राज्याधिकार कोणी देणार नाहीं हें जरी उघड असलें तथापि कविराज्यांत त्यांना मानाचें स्थान मिळेल यांत शंका नाहीं. आणि हें स्थान त्यांचें राजत्व विसरून व केवळ कवित्व पाहून त्यांना देण्यांत येईल. आधु-निक कवींपैकींच कांहीं डोळ्यांपुढें आणले तर असें म्हणतां येईल कीं प्रस्तुत राजकवींमध्यें तांब्यांचें जरी स्निग्ध-गंभीरत्व किंवा रेवरंड टिळ-कांचें सुसंस्कृत लालित्य नसलें, तसेंच केशवसुतांचा राकट व कणखर जोर, मायदेवांचा सुबोध विनोद, गडकऱ्यांचें शब्दप्रभुत्व व चमत्कृति-

जनकत्व, ‘ माधव जूलिअनां ’चें मधूनमधून धक्का देणारें पण एकंदरींत दिपवून सोडणारें व जागृति उत्पन्न करणारें कल्पना-धाष्टर्य, यशवन्तांचें रम्य औदासीन्य व मधुर कल्पना-चातुर्य, गिरीशांचें शब्दमाधुर्य, आनंदराव टेकाड्यांचा देशाभिमान व त्यांचें अलीकडील रम्य गूढवादित्व, बेहऱ्यांचा सडेसोट जोरकसपणा, इत्यादि इत्यादि गुण प्रस्तुत काव्यांमध्यें त्यांच्या इतक्या प्राचुर्यानें व उत्कटत्वानें नसले, तथापि यांपैकीं कांहीं गुण थोड्याबहुत प्रमाणांत आहेतच व आधुनिक कवींच्या सभेंत त्यांना पहिल्या रांगेंतल्या खुर्च्यांपैकीं खुर्च्या जरी मिळाल्या नाहींत तरी दुसऱ्या रांगेंतल्या खुर्च्या खाचितच मिळतील, आणि कवित्वशक्तीचा कालान्तरानें अधिक विकास होऊन लौकरच ते पहिल्या रांगेंत येतील. ‘ द्रौपदीची दुर्दशा,’ ‘ हांक ’ ‘ विमलेस ’ इत्यादि माईसाहेबांच्या कविता कोमल भावनेच्या दृष्टीनें, व भाषेच्या सहजरम्यत्वाच्या दृष्टीनें, कोणाहि कवीस भूषणावह होतील अशा उच्च दर्जाच्या आहेत. त्याचप्रमाणें ‘ चंद्र चवथिचा ’ या चालीवरचें

**हृदय-रंजना ।**
**प्राणजीवना ।**
**चरण-कमल दाखवुनी रिझविं मन्मना ॥**
**नाहिं आसरा ।**
**जीव बावरा ।**
**होय जलावीण जसा मीन घाबरा ॥**

—हें पद नाद-माधुर्याच्या व शब्दसौष्ठवाच्या दृष्टीनें सुप्रसिद्ध सत्कवितांच्या रांगेंत बसण्यास लायक आहे. तसेंच, भाऊसाहेबांच्या ‘ उद्धार ’ व ‘ योगीन्द्र ’ या पुढें प्रसिद्ध होणाऱ्या खंडकाव्यांतील दिलेले कांहीं उतारे, हीं खंडकाव्यें सत्कवीला शोभण्यासारखीं होणार अशी ( शितावरून भाताची परीक्षा या न्यायानें ) स्पष्ट ग्वाही देत आहेत. तात्पर्य

**नाहीं काव्यपटुत्व अंगिं, तितुकी दैवी कृपाही नसे ।**

असें भाऊसाहेबांनीं विनयानें किती जरी म्हटलें, व माईसाहेबांनींहि उचित

अशा विनयानें आपले श्वशुर श्रीमन्त बाबासाहेब यांना उभयतांचीं काव्यकुसुमें अर्पण करतांना त्यांना साध्या 'तुलसी-दलां'ची जरी उपमा दिली, तरी हा काव्यग्रंथ वाचून

**काव्यानंदिं तरंगतां किति किती मद्वृत्ति संतोषली।**

असें त्या श्वशुरांना व इतरांना आनंदानें व स्वयंस्फूर्तीनें म्हणावेंसें वाटेल; आणि या ग्रंथांत दिसून येणारे कवित्वगुण अधिक विकसित होऊन सत्कवि-मंडलांत या राजकवींना लौकरच उच्चतर स्थान मिळावें अशीच बाबा-साहेबांच्या व इतर कोणाच्याहि मनांत मनःपूर्वक आकांक्षा उत्पन्न होईल.

हिंगणें बुद्रुक,
मकरसंक्रान्त,
ता. १४-१-३२

**वा. म. जोशी**

---

प्रेम जयाचें आहे कन्येपरि मजवरी तया चरणीं।
होवोनि नम्र अर्पी स्नुषा तयांची स्वकीय 'निर्झरिणी'

# नि र्झ रि णी

## १ निर्झरिणी

[ वृत्त—मंदारमाला ]

धांवे तडित्प्राय रानांवनांतून
नागीण फूत्कार जैशी करी
कोठें प्रपातस्वरूपास घेवोनि
दे अंग टाकूनि भूमीवरी ।

कोठें लपे निर्झरीणी तरूंतूनि
कोठें दिसे गद्गदा हांसत
गंगेपरी ही मला उद्धरायास
पृथ्वीवरी येतसे वाहत ।

कोठें खळाळोनि, कोठें धडाडोनि
मंजूळ वंजूळ कोठें स्वन
गाणें जणूं हें शिवाचें निनादोनि
अष्टा दिशांना करी पावन ।

श्रीरेणुकेचा तुषारस्वरूपांत
हास्यध्वनी चालला मोहक
किंवा गमे अंबिकेचा भरारोनि
वातानुरोधें हले अंशुक ।

हा दूधहंडा जणूं अंबरांतून
कोणी दिला भूवरी लोटुनी
कीं कामधेनूस येऊन वात्सल्य
पान्हा स्रवे सारखा तेथुनी।

सूर्यास्त होतांच आकाशमार्गांत
तारांगणांचे दिवे लागती
साधर्म्य तेथें मला निर्झरीचेंच
भासे—इथें गुंतली मन्मती।

कोणास वाटेल दर्पोक्ति ही सर्व
—मीं वर्णिली साच भागीरथी
तैशीच ही निर्झरीणी मला सत्य
—तृष्णा करी तृप्त माझी पथीं !

—स. र. पंतसचिव

# २ तुलसी-दल

भोराधीश्वर नृपती, भाग्य जयाचें असे बहु थोर।
आहे पालनदक्ष प्रजेवरी प्रेम करुनि अनिवार॥

सुविनीत कीर्तिमंडित असुनी ज्याला नसे अहंकार।
ठेवोनि धीर वृत्ती सदैव वागे करोनि सुविचार॥

विद्याकलादिकांना आश्रय देण्यांत युक्त मति ज्याची।
दानातें नित्य करी, वाढवि कीर्ती सदैव राज्याची॥

कौशल्य राजधर्मीं, मजला येईल केंवि आकळितां।
प्रेमळता हृदयाची, येई मज परि सदैव अनुभवितां!॥

प्रेम जयाचें आहे कन्येपरि मजवरी तया चरणीं।
होवोनि नम्र अर्पी स्नुषा तयांची स्वकीय 'निर्झरिणी'॥

'निर्झरिणी' काव्याची अर्पी जरि आपुल्या पदीं आतां।
'तुलसी-दल' समजोनी स्वीकारा प्रेमयुक्त रघुनाथा!॥

आरोग्य आयु यांसह सत्कीर्तीतें प्रभू सदा देवो।
हे बोल बोबडे परि मानुनि घ्याया मती तया होवो॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

# ३ विमलेस

[ चाल—दाखि ऐसें मानुनियां० ]

गाइं गोड गान तुझें। मधुर तान घेउनियां॥
एकतान वृत्ति होत। गान तुझें ऐकुनियां॥

साथ करिन मीहि तुला। मूकभाव दावुनियां॥
गाइं परी गाइं, सखे। तेंच पुन्हां घोळुनियां॥

चंद्ररूपिं तव गानीं। दुःखतिमिर जाइ लया॥
वाळवंटरूपिं जगीं। शीतल ही जणुं छाया॥

तव गानावीण गमे। इतर गान मज वायां॥
तव गानीं सौख्य किती!। शब्द नसाति वर्णावया॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

# ४ हृदयार्पण



[ राग—गौडसारंग; ताल एका ]

चाल—वंशीवट जमुनातट०

मदन-वदन मन सुखवित माधव हा येई।
पैंजण-रव करि झुमझुम, चित्त-वेध होई॥

चरण-कणत ठुमक ठुमक हंसत येत पाहीं।
पद-रुणझुण श्रवण-सुभग सतत कर्णि येई॥

अलि-रुंजनिं, किंकिणि-रविं, ताल-पदीं गाई।
अरुण-वर्ण वसन खुलत लेवविलें पाहीं॥

बघुनि कुमुदरमण-वदन मन विलोल होई।
भ्रमर-पुंज वदन-कंज-मधु-विलुब्ध येई॥

चित्त-मुकुल हो प्रफुल्ल, गगनिं शशी पाहीं।
कल-हंस-ध्वनि वनिं हा तुजकारणिं होई॥

तव पद-रत विनत होत राधिका तुझी ही।
हृदय-कमल कुसुमशरा! चरणिं तुझ्या वाहीं!॥

—स. र. पंतसचिव

# ५ विरहिणी राधा

[ चालः—दासि ऐसें मानुनियां० ]

" कृष्ण माझा प्राणसखा। देखिला गे काय कुणी ? " ॥ध्रु०॥

वेणु घेतां मुखिं हरी। चित्त माझें सर्व हरी।
किति गोड त्याचि वाणी। देखिला गे काय कुणी ? ॥

चिडवीही परोपरी। जाधिं रुसुनि जाय दुरी।
करि माझि विनवणी। देखिला गे काय कुणी ? ॥

गौळणींसि फसवोनी। चोरितसे दूध लोणी।
—किति काढुं आठवणी !। देखिला गे काय कुणी ? ॥

कालियास मर्दुनियां। जन-ताप नेइ लया।
—गुण गातां थके वाणी। देखिला गे काय कुणी ? ॥

गुंतलासि कोठें कान्ह्या ?। तुजवीण वेडि सया।
शिणलें रे आळवुनि। देखिला गे काय कुणी ? ॥

अंत पाहुं नको आतां। कंठिं प्राण येति नाथा !।
घेइं धांव चक्रपाणी !। देखिला गे काय कुणी ? ॥

—वनमाळि वेगें आला। बाहु-पाशिं घेइ तिला।
नामिं त्यासि 'सरोजिनी'। रेखिला गे भावें मनीं ! ॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

## ६ द्रौपदीची दुर्दशा

[ चाल—अजि अक्रुर ह्रा० ]

“ हे मुरलिधरा ! संपे का तव करुणा ।
शरण मी रिघावें कवणा ? ॥

मम भावोजी मजला ओढुनि नेती ।
सोडुनी सर्व नय नीती ॥

मज अंगभरी वसन नसेही ल्याया ।
मम लाज तुलाची कान्ह्या ” ॥

हें वदतांना कंठ तिचा गहिंवरला ।
ती अगतिक होती बाला ॥

कच कुरळ तिचे दुःशासन तो ओढी ।
भूमीवर तिजसी पाडी ॥

परि झडकरि ती पदर सांवरित उठली ।
कोपानें त्याला वदली ॥

“ मज दुष्टा ! तूं सांग असा कां छळिसी ।
पापाचा धनि कां होशी ? ॥

ह्या अबलेच्या छलनिं शौर्य तव काय ।
समरीं तव लढुं दे काय ! ” ॥

परि नीचानें द्रौपदिचा कर धरला ।
सत्तेचा मद ज्या चढला ॥

अति दर्पानें मदान्ध-दृष्टी झाला।
धिक्कारुन तिजला वदला॥

"चल दरबारीं पुरे तुझा अभिमान।
दासीला कसला मान?॥

मी मांडिवरी बसविन कौरवपतिच्या।
तूं म्हणशिल तरि कर्णाच्या"॥

ह्या परुषवचा परिसुनि ती घाबरली।
कदलीसम ती थरथरली॥

निज हस्तानें झिडकारुनि त्या उठली।
अन्तःपुरिं धांवत गेली॥

क्षण हरिणि जरी वृकापासुनी सुटली।
परि हाय पुन्हां सांपडली!॥

मनिं दुष्ट म्हणे 'आणिन शोधुन खास।
पाताळीं जरि लपलीस॥

प्रतिबंध जरी करि गांधारी मजला।
तिज देखत ओढिन तुजला'॥

हे शब्द मनीं बोलुनियां बहु रागें।
तो जाई तिचिया मागें॥

परि कृत्य असें पाहुनियां गांधारी।
संतप्त झाली भारी॥

"हें बाळ तुवां काय सांग चालविलें।
मम डोळे कां ना मिटले!॥

तिज सभेमधें ओढुन कां नेतोस।
कां विटंबना करतोस?॥

लोटूनि कुळें बेचाळिस नरकांत।
करुनि कां घेसि निजघात ? ॥

मग पत्नि म्हणे, " पुरे पुरे, जा परता।
कां संतिची छळना करतां ॥ ! "

परि तिजलाही ढकलुन त्यानें दिधलें।
द्रौपदिचें कर्षण केलें ॥

ज्या वेढियलें असुरी आकांक्षांनीं।
कटु गमे बोधवच कानीं ॥

मग नीचानें सभास्थानिं तिज आणिली।
भूपतिच्या पुढती नेली ॥

दुर्योधनही बोले तिजला " दासी।
मांडीवर बैसे ऐशी " ॥

हे कर्णकटू शब्द जिव्हारीं गेले।
द्रौपदिचें मन थरथरलें ॥

ती अबला हो ! हांक प्रभूला मारी।
" ये धांवत झणिं कंसारी ! " ॥

ती मूक सभा द्रौपदि देखे रागें।
पति दिसले हतबल मागें ॥

" कां बसलि, " म्हणे, " सर्व सभा ही स्तब्ध।
ऐकुनिही असले शब्द " ॥

परि मूकचि ते, धर्म जाणते सूक्ष्म।
त्या सभेंत विदुरहि भीष्म ॥

ती त्यांस म्हणे 'नीति कुठें हो यांची।
मी स्नुषा नव्हे का तुमची ! ' ॥

दुःशासन ये तिजजवळी धांवोनी।
निरि ओढे फरफर धरुनी ॥

ती करुण वचें टाहो फोडूं लागे।
कृष्णाची करुणा भाके ॥

" ह्या व्यसनिं मला नाहीं दुसरा असरा।
प्रेमाच्या वसना पसरा ॥

या जगतिं हरी! कोणि न आतां वाली।
ये, धांवत ये, वनमाली! ॥

तूं दुष्टांचा संहारक म्हणवीशी।
मुग्धता अशी कां वरिशी! ॥

मम भाव खरा तुजवरती जर असला।
निश्चयें पावशिल मजला ॥

किति करुण वचें करतें मी आक्रोश।
कंठाला पडला शोष ॥

परि येईना करुणा कैशी देवा।
हा कलंक तुझिया नांवा! ॥

तूं असशी ना माझा प्रेमळ बंधू।
अटला कां करुणासिंधू! ॥

मी दीरांना वाढाया जइं गेलें।
कंचुकिचें बिरडें सुटलें ॥

त्या समयीं तूं मजसि चतुर्भुज केलें।
लाजेला मम राखियलें ॥

तो मायेचा ओघ कसा ओसरला।
विसरशी काय भगिनीला!" ॥

प्रिय भगिनीच्या श्रवुनि अशा आक्रोशा।
तोडिले रुक्मिणीपाशा॥

श्रीकृष्णाचें हृदय फार गहिंवरलें।
खळखळ जल नेत्रा आलें॥

तो धांवत ये, ब्रह्मा ज्याच्या नाभीं।
भगिनीस म्हणे "तूं ना भी॥

मी असतांना कोण सांग तुज छळतो?।
शासन मी त्याला करतों"॥

मग नेसवि तो साड्या तीस मुरारी
पैठणी, मुगवि, शेलारी॥

दुःशासन हो फेडुन वसनां दमला।
मनिं अतिशय कष्टी झाला॥

'ही प्रभुलीला!' 'धन्य धन्य पांचाली!'।
दुमदुमे शब्द भोंतालीं॥

क्षणिं कृष्णाची मूर्ति ठायिं त्या प्रकटे।
द्रौपदीस कौतुक वाटे॥

तें पाहुनिया रम्य मनोहर ध्यान।
सर्वांचें हरलें भान!॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

## ७ हांक

—+:*:+—

( चाल—जाके मथुरा मे कान्हा० )

येई कृष्णा धांवत येई। लवलाही येई ! ॥ ध्रु० ॥
वाट बघोनी नेत्र शीणले। करुणा कैसी नाहीं ! ॥

संकटिं देवा भगिनी पडली। झोप कशी तुज येई ! ॥
शोभे ना तुज रीत अशी ही। व्यर्थचि म्हणविसि 'भाई' ॥

—भगिनीची ही हांक ऐकुनी। उभा पाठिशीं राही ॥
म्हणे मुरारी " मी असतांना। व्यर्थ भिशी कां ताई ! " ॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

## ८ मत्स्यगंधा

-+*∽*+-

[ शंतनु मत्स्यगंधेची विनवणी करतो ]

( चाल—वसंतीं बघुनि मेनकेला० )

बाले, मूक कंवि बसशी !
विनती माझी मुग्धयौवने, पटली ना तुजसी ! ॥

विनवित बसलों किति वेळ
तव चित्तामधिं विचार कसले वद विणिती जाल ? ॥

तूं खरि कोळ्याची पोर
प्रीतीजालीं मत्स्य पकडणें तुजसि कला सुकर ॥

फुललें यौवन तव अंगीं
सुरांगनेची कान्ती चढली तुजवरि तन्वंगी ॥

स्मित तव गालांवरि खुलतें
उन्नतहृदये ! रूप बिंवलें मम मानसिं पुरतें ॥

असे तव मत्स्यासम दृष्टी
करि मजवरती सुचिरे, आतां प्रेमामृतवृष्टी ॥

म्हणति मज 'स्वामी जगताचा'
तव हृदयाचा स्वामी नसतां आहें नांवाचा ॥

मदधिन सर्व सुखें असती
तुजविण त्यांची गोडी नुरली आतां मज सुदती ॥

तुझ्या मनिं मन गुंतुनि गेलें
पृथ्वीमधले विषय तुजविणें सकल तुच्छ गमले ! ॥

मजवरि प्रसन्न नच होशी
जीवित माझें निष्फल यापरि सुंदरि, कां करिशी ? ॥

चढविन महिषीपदिं तुजला
युगायुगान्तरिं गातिल जन तव दिगन्त कीर्तीला ॥

जगाची भीति कशा धरिशी
स्वतन्त्र चित्ता पटेल तैसें कां नच आचारिशी ? ॥

निर्मिन मेघ सभोंवार
दुष्ट जगाच्या दृष्टींमधुनी नेइन तुज पार ॥

माझें तुजवरि मन गेलें
म्हणुनी वाटे मदर्थ तुजला ईशें निर्मियलें ॥

हृदयस्फूर्त सत्य पाळीं
'सत्यवती' जन म्हणुनी म्हणतिल तुजला भुवनतलीं ॥

चुळबुळ करिती जललहरी
म्हणती त्याही 'धीवरकन्ये ! याला स्वीकारीं'

नौका ढकलीं दर्यांत
जगद्बंध ते, तोडुनि जाऊं अनंतसौख्यांत ! ॥

—प्र. र. पंतसचिव

## ९ जानकी, वेड तुज लागे !

( चाल—उद्धवा शान्तवन करि जा० )

लाडके ! काय हें वदसी । हें खरें गमेना मजसी
विपरीत भासते मजला । मजसंगें येतें म्हणशी
प्रति इंदुमती तूं गमशी । कुसुमाहुनि कोमल असशी
हा नाद सोडुनी देई
तुज नेणें शक्यचि नाहीं
मज जाऊं दे लवलाही
कां बघशी ऐशी रागें ? । जानकी, वेड तुज लागे ! ॥

राजाची कन्या असशी । वनवास तुला जाचेल
मृदु शय्येवर पहुडावें । तृणशय्या तुजसि खुपेल
तुज कंटक रुततिल पायीं । तुज क्लेश फार होतील
साहशील कैसे हाल
करिं विचार कांहीं वेळ
मग माझे पटतिल बोल ।
नयनांत अश्रु हे कां गे ? । जानकी, वेड तुज लागे ! ॥

तव म्लान वदन हें बघुनी । विस्मरतों कर्तव्याला
करपाश कसें तव तोडूं ! । कां मोडूं पित्राज्ञेला !
या अशा रीतिचा सखये । मज पेंच दुहेरी पडला
लाडके हट्ट तूं, सोड
हा प्रेमपाश तव तोड
मम निश्चयास दे जोड
तुज पाहुनि निश्चय भंगे । जानकी, वेड तुज लागे ! ॥

तव अश्रुरूपि बेडींत । बंदिवान मन्मन झालें
मी विमूढ झालों देवी । मज मीपण नाहीं उरलें
करूं काय सांग या वेळीं । मम चित्त बावरून गेलें
दैवाचा तुटला झोला
ना उपाय कांहीं याला
गेलेंच पाहिजे मजला
प्रेमाचे तोडुन धागे । जानकी, वेड तुज लागे ! ॥

किति कठिण वाटतें सांगूं । तुज सोडुन जाणें मजला
तव विरह-कल्पना नुसती । साहीना मम जीवाला
कोमले ! परी करूं काय ? । बांधियलों कर्तव्याला
हृदयाची तळमळ होई
स्वस्थता मनाला नाहीं
दुःखाला भरतें येई
जणुं पिसें जिवाला लागे । जानकी, वेड तुज लागे ! ॥

किति शोक असा करशील । धरि अश्रु, सखे ! आवरून
दे निरोप मजला प्रेमें । क्षण त्वन्मुख सस्मित करून
हास्य तेंच हृदयीं स्मरूनी । विपिनीं मी दिन कंठीन
किति चंद्रवदन तव सुकलें
गालिंचे गुलाबहि विरले
कुरळ केश बघ विसकटले
शिणविसि कां देह शुभांगे । जानकी, वेड तुज लागे ! ॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

# १० अहल्या-शिळा

युगायुगान्तरिं तिष्ठत बसलें मी रघुराया।
उद्धरिशी मज कधिं देवा तूं लावुनि पाया! ॥ ध्रु० ॥

डोळे थकले, मति जड झाली, शिणली काया
स्वरूप टाकुनि शिलामयी मी झालें राया ॥

सांगुं किती तुज, वनमाई ही दावी माया
जननीचाही इतुका प्रेमा न ये प्रत्यया ॥

करिती खग कूजन अलि रुंजन सतत वनीं या
वन्यसुमेंही घालिति पाखर मज सुखवाया ॥

कंडूपीडित गाई येती शिर घासाया
तृणकवळांना सोडिति हरिणी बघ ह्या ठाया ॥

श्यामल घन नभिं जमुनी धरिती मजवरि छाया
जलाभिषेका करिती तेही मज शमवाया ॥

यत्ना करिती किति किति परिनें मज सुखवाया
रामा! तुझियाविना कधीं ना शान्ति मना या! ॥

स्फूर्ति कवीची जेंवी हृदयीं उज्ज्वल काया
परि शब्दीं ती शिलारूप हो, तशि मी वाया ॥

सूर्य-अनिल-जल यांच्यामध्यें ठेवुनि काया
तप आचरितें, दया करावी मजवरि सदया ॥

गंधरूप तूं सन्निध वसशी अजवरि राया
आतां झालें अति उत्सुक मी तुज देखाया! ॥

—स. र. पंतसचिव

# ११ धावा

—+*+—

[ चाल—हा कर्मयोगि अवतार, लोकमान्यांचा० ]

मम परिसुनियां धांवा। यदुवरा, धांवा! ॥ ध्रु०॥
क्षणभरि बाजुस ठेवा पांवा
भानरहित मी झालें देवा,
सांभाळीं जीवा। यदुवरा धांवा! ॥

भवाटवींतिल मी वाटसरू
चुकलेलें हें दीन वासरूं
सन्मार्गा दावा। यदुवरा, धांवा! ॥

उरलि न इच्छा धनदौलतिची
मानपान वा इतर सुखांची
प्रेम एक ठेवा। यदुवरा, धांवा!

पतितपावना! मजासि उद्धरा
जगतिं न उरला दुसरा थारा
सार्थ करा नांवा। यदुवरा, धांवा! ॥

विसर तुझा मज कधिं न घडावा
तव कारणिं हा देह पडावा
इतुका वर द्यावा। यदुवरा, धांवा!

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

# १२ त्यागमूर्ति !

—+++:*:+++—

[ चाल—त्याग करुनी स्वर्गिचा प्रभु० ]

त्यागमूर्ती भूमिवरतीं नृ-मणिरूपें पातली।
राज्यलक्ष्मी, अखिल अवनी अंकिता ज्या जाहली॥

भुवननाथा ! मन विलासीं सौख्यधामीं रंगुनी।
जाइना तव; वृत्ति मग ती गेलि कोठें गुंतुनी? ॥

आर्तवाणी ऐकुनीयां हृदयवृत्ती बावरे।
दुःखभारिता हृदयसरिता खळखळा तव पाझरे॥

प्रियवधूला यशोधरेला सांग कैसें सोडिलें !
राज्यतृष्णा जिंकुनीयां कठिण व्रत तूं पाळिलें॥

कुसुममृदुला प्रेमपाशां तोडुनीयां टाकिलें।
कंटकावृत भीतिसंकुल काननाला सेविलें॥

त्यागधारा भूमिवरतीं सोडिली सुखवर्धिनी।
जान्हवी ही पतित जनता उद्धरी जणुं वाहुनी॥

गौतमा ! तुज नमन करितों असाशि भूषण भारता।
दिव्य मज ही त्यागवृत्ती येइं कधिं का पाळतां? ॥

—स. र. पंतसचिव

## १३ प्रतापगडच्या देवीपाशीं

गझल

[ चाल—‘विनती बालांची’ या पदांतील अंतऱ्यासारखी ]

देवि भवानी, तुझ्या दर्शना वर्षारंभीं आलों ।
चरणीं भावयुक्त नमलों ॥

बाल्यापासुनि तुला पूजिलें, कुलदैवत तूं अमुचें ।
याहुनी भाग्य थोर कुठचें ? ॥

नाना दैत्यां संहरुनी तूं संतांना सोडविशी ।
हलका भुवनभार करिशी ॥

‘सप्तशतीं’तिल त्वदीय कीर्ती दुमदुमते त्रिजगांत ।
घुमते तीच अंतरांत ॥

शिवरायाचें चरित्र करिशी उज्ज्वल तूं शौर्यानें ।
झाला धन्य तव कृपेनें ॥

‘वैरिविनाशन’ सप्तशतींतिल पद ऐकुनि जणुं शिवबा ।
गाजवि शत्रुवरी ताबा ॥

तुझेंच दर्शन जणूं होतसे ‘भवानि’ खड्ग बघुनि ।
वृत्ती ये उचंबळोनी ॥

खड्ग काढुनी रक्त वाहवी—प्रताप शिवरायाचा ।
माझी येथ रमे वाचा ! ॥

असंख्य महिषासुरां मर्दण्या बल तुजंपाशीं देवी।
त्यांतुनी अंश तरी देई॥

चरणतीर्थ तव देवो दीक्षा नवीन चैतन्याची।
ग्वाही वाटते यशाची॥

मंगलमाते, तव हृदयींच्या सुवर्णरेषा दिसती।
येई कल्पनाहि चित्तीं॥

भक्ताविषयीं वात्सल्याची सरिता तुझिया हृदयीं।
भिजुनी अन्तरंग जाई॥

स्वप्नीं येउनि मजला गमलें बोलविलेंस कृपेनें।
भरले नयन जलानें!॥

तव भक्तांवरि कृपा असावी, सुखांत त्यांना ठेवीं।
इच्छा मज दुजी नसावी॥

—स. र. पंतसचिव

# १४ राजसिंह

—+∽*∽+—

[ चाल--वीर मराठे जमले मेळीं० ]

शिवरायातें प्रथम नमोनी आरंभीं ह्या कवनाला
ज्याची कीर्ती थक्क करितसे साऱ्या भारतखंडाला ॥

तनय तयाचा संभाजी हा प्रतापशाली बहु झाला
जणूं बापसे सवाइ बेटा वाटे साऱ्या जगताला ॥

शौर्य किती तरि अपूर्व त्याचें, जबडा फोडी वाघाचा
लीलेनें तो करी पराक्रम असंख्य, निधड्या छातीचा ॥

संकटांस ना कधिं डगमगला तोंड देतसे शौर्यानें
तेज जयाचें बघुनी व्हावें लीन पदीं वनराजानें ॥

कलुषा नामें जिवलग होता जीवींचा त्याचा एक
जिवलग कसला ? जीव घ्यावया टपला होता तो नीच ! ।

गोड बोलुनी छाप बसविली संभाजीवर दुष्टानें
राज्यामध्यें हुकुम सोडिले चाहतील ते हक्कानें ॥

पान हलेना राज्यामध्यें कलुषाच्या शब्दावीण
तोच होउनी बसला राजा, राजाला पुसतो कोण ? ॥

इतुक्यानेंही समाधान ना झालें त्याच्या चित्ताचें
पुरता येण्या कबजामध्यें व्यसन लाविलें वारुणिचें ॥

अन्न जयाचें खाई त्यावर उलटे, किति हें दुष्ट मन !
दुग्ध पाजुनी जरिहि पोशिला साप टाकिना अधम गुण

कलुषा नच हा कलीच शिरला संभाजीच्या राज्यांत
कपट करोनी धूळिस मिळवी राज्य आमुचें निमिषांत ॥

वेढा पडला चहुं बाजूंनीं 'दीन दीन' म्हणती यवन
भाले सरसावुनी सर्वही गेले त्यावर धांवून ॥

बेसावधशा स्थितींत असुनी, शस्त्रहि नव्हतें करिं ज्याच्या
केव्हां कैशी येइल वेळा कळति न लीला दैवाच्या ! ! ॥

पिंजऱ्यांत हा सिंह अडकला इलाज कांहीं चालेना
स्थिती तयाची काय जाहली पुढील मजला वदवेना ! ॥

* * *

एके दिनिं मी तुळापुराला गेलें संध्यासमयाला
गततेजाचें स्मरण होउनी धार लागली नयनांला ॥

अश्रुजलें त्या भरुनी वाटे वाहे तेथिल सरिताही
नरवीराची दुःस्थिति बघुनी अजुनी खळबळ तिचि होई ! ॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

## १५ अनारकली

—+—:*:—+—

[ चाल—उद्धवा शान्तवन० ]

बांधिले मनोरे मोठे। ते सारे परि ढासळले
दावुनियां मोठी आशा। दुर्दैवें मज ठकवीलें
हें वैभव दो दिवसांचें। नाशाला कारण झालें

सौख्याचें होतां स्मरण
मम हृदय येतसे भरुन
मज बरें वाटतें मरण

अपराध कांहिं ना घडला। ये हाय काय नशिबाला !॥

हा दोर किती आवळिला। अंगाची होते लाही
मज जहर तरी पाजा हो। यातना सोसवत नाहीं
तडफडे जीव अनिवार। कशि कींव तुम्हां ना येई ?

मज करा ठार छाटून
एक घाव तुकडे दोन
परि घेउं नका छळुछळुन

हा प्राण घाबरा झाला। ये हाय काय नशिबाला !॥

थोडें तरि पाणी पाजा। किति कंठ कोरडा पडला
डोळ्यांत येतसे प्राण। व्याकूळ जलाविण झाला
कां बघुनी हंसतां ऐसें। पसरितें पदर तुम्हांला

आधार कुणी ना मजला
मी अनाथ झालें अबला
जर मारी भूप जनांला
जाऊं मग शरण कुणाला ? । ये हाय काय नशिबाला ! ॥

नाहिं का दया तुम्हांला । समजतां तुम्ही मज कोण ?
जरि गरीब वरुनी दिसलें । तरि नाहिं कुलाची हीन
दुष्टांनो ! थोडें थांबा । मम प्राणसखा सेलीम—
येईल अतां धांवून
ही माझि दशा पाहून
टाकील तुम्हां छाटून
परि तोही कोठें दडला ! ये हाय काय नशिबाला ! ॥

प्रेमाचा सारीपाट । मौजेनें खेळत होतों
कल्पना न शिवली एशी । त्यांत दंग झालों होतों
हातांत घेउनी फांसे । खुळुखुळुनी टाकित होतों
होती न कुठें सुरुवात
दुर्दैवें केला घात
बेरंग होइ रंगांत
उधळून डाव टाकियला । ये हाय काय नशिबाला ! ॥

परि व्यर्थ दोष तुम्हांला । देउनी काय उपयोग
असतील नशीबीं जितके । भोगिले पाहिजे भोग
टाळणें शक्य ना कोणा । प्राक्तनांत लिहिला योग
मागल्या जन्मिं मी खास
कोणाच्या तरि प्रेमास
बिघडविलें करुनी द्वेष
हें योग्यच शासन मजला । ये हाय काय नशिबाला! ॥

मम निरोप जाउनि कळवा। सत्वरीं जीवितेशाला
" प्रेमाचा आदर नाहीं। त्या जगांत राहुं कशाला ?
जो खऱ्या भक्तिचा भोक्ता। ऐशा त्या परमेशाला--
भक्तीनें अळविन त्यास
प्रेमाची किंमत ज्यास
मागेन खऱ्या न्यायास
तो देइल आश्रय मजला। ये हाय काय नशिबाला !॥

" संपला येथ सहवास। मम भेट अतां स्वर्गांत
विस्मृती तुला मम होवो। प्रार्थीन असें दिनरात
गुंफीन अश्रुची माला तूं येशिल तोंपर्यंत
न्यायेंच राज्य चालीव
सत्याची आवड ठेव
धर्मावरि ठेवीं भाव।
भजत जा नित्य ईशाला। हा प्रणाम राजा तुजला !॥"

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

## १६ निसर्गसत्कार



[ वर्षाकालची पार्श्वभूमी ]

चाल—भूपती खरे ते०

रवि तळपत असतां जल-धारा ह्या गळती ।
जणुं आनंदाश्रू सतेज त्वन्मुखिं जमती ॥

सुरधनू पसरलें दोन्ही क्षितिजा भिडतें ।
जणुं प्रेम तुझें हृदयास हृदय जडवीतें ॥

ह्या प्रसन्न झाल्या दिशा तुला देखाया ।
खळखळती ओहळ मार्ग तुला होण्याला ॥

पुष्पांवरि दिसती जलबिंदू बघ ठेले ।
कीं धरा निरखि तुज सजल लोचनीं विमले ॥

वृक्षांतुनि जातां कष्ट होति ते तुजला ।
हा वायु सारितो म्हणुनि दूर शाखांला ॥

रुतते मृदु चरणां कठिण भूमि फिरतांना ।
वृक्षांनीं तव पाथें हंतारिलें पर्णांना ॥

तुजसाठीं गाती वृक्षीं पक्षी सकल ।
संगीतें पाथिंचे श्रम तव ते हरतील ॥

वनवृक्ष तुजवरी करिती सुमवर्षाव ।
सुम सडा पडे हा पायदळीं, त्या सेव ॥

त्वत्कीर्तिगंधकुसुमांनीं शाखा लवल्या ।
हा दूत पवन वाहतां वल्लरी डुलल्या ॥

हीं स्वच्छ सारसें, हृदयें जणुं सत्कविंचीं।
आरसा तुजपुढें होउनि स्थित केव्हांची॥

बघ निसर्ग तत्पर पुष्पाभरणा द्यावा।
ईश्वरी-प्रसादा धारण करिं या समया॥

नेसण्या वल्कलें नैसर्गिक तुजपाशीं।
कंचुकी पुष्पमय सौगंधिक पायाशीं॥

सुम सुमांस गुंफुनि कंचुकि रचिली घालीं।
स्तनभारावरणा अपुरी जरि ही पडली॥

लेवुनी अंगभरि माला विविधाकारीं।
दे कर्णि खोंचुनी मंजिरि शोभविणारी॥

हीं निसर्गलेणीं लेवुनि विहरिशि येथें।
तुज रमवायाला सृष्टी तत्पर दिसते॥

नभपटीं करोनी मनोज्ञ रचना भारी।
बघ सांजसमयिं रंगवी निसर्ग-चितारी॥

सृष्टींचे पाहत नानाविध हे खेळ।
तूं असाच ना घालविशी सारा वेळ॥

त्वत्स्पर्श करितसे पावन वन तन्वंगी।
जणुं शकुन्तला तूं प्रवेशसी मन-रंगीं॥

—स. र. पंतसचिव

## १७ गुराखीण

—+*∽*+—

[ भूपती खरे ते० ]

हा दिनकर गेला अस्ताला गे, पाहीं।
खग्रास-ग्रहण जणुं आशा-अरुणा बाई !॥

हा नैराश्याचा भयाण अंधःकार।
मम चित्त विदारी विस्मरलें घरदार !॥

मी आहें कन्या थोराची जरि सखया !।
तुजसाठीं झालें गुराखीण या समया॥

ही रानफुलांची माळ तुला मीं केली।
कोमेजुनि गेली, दीन-वदन किति झाली॥

हे अश्रु ढाळुनी नयन, राजसा ! शिणले।
जल टिपुसभरीही त्यांत न आतां उरलें॥

तूं चटक भेटिची प्रथम कशा लावियली?।
ही प्रेम-ज्योती तूंच मनीं पेटविली !॥

ही शोभत नाहीं आतां असली करणी।
मी फसलें खचिताचि लागुनियां तव भजनीं॥

ही वेळ असे बघ गाई परतविण्याची।
तूं जात असे जइं वेळ होइ सांजेची॥

घरिं बोलत बोलत जात असूं प्रेमानें।
मज विसर जगाचा पडला तव मधुवचनें॥

—हें सर्व स्मरुनी हृदय भरोनी येतें।
परि तुला निष्ठुरा! कांहिं न त्याचें वाटे॥

* * *

हे पशुपक्षी घरिं निजतिल आनंदानें।
तुजविणें द्यावि मज काळझोंप देवानें!॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

# १८ रण-झंकार

—+++:*:+++—

[ हिंदुपद्पातशाहींतील एक दृश्य ]

चाल—कौरव पांडव संगर तांडव०

वीर मराठे जमले मेळीं खड्ग लावुनी कमरेला।
तानाजी त्यांमध्यें चमकला शुक्र तारकागणीं गमला॥

म्हणे " सिंहगड जिंकूं आपण, असे भरंवसा मज साचा।
शिवरायाची आज्ञा मजला, कर माथ्यावरि भवानिचा!"॥

मुंडासें तें डोइं बांधिलें, लटके कमरीं तरवार।
सिंहाचा सरसावे छावा, छाति शोभते भरदार॥

शिपाइ-बाणा अंगीं बाणला, प्राणाची पर्वाच नसे।
'स्वामिकार्यिं हा देह पडावा' हीच मनीषा मनीं वसे॥

धनी बैसतां पाठीवरती फुर्र करी तो अश्ववर।
गमती रणझुंजारहि दोघे, अश्व तसा जैसा स्वार॥

वाजीवरती हा रणगाजी चाले जयघोषा करित।
स्वतन्त्रतेची करांत घेउनि ध्वजा फडकवी गगनांत।

म्हणती 'हरहर महादेव' ते सेना चाले उत्साहें।
तानाजी हा विनी होउनी आघाडीस सदा राहे॥

वीरश्री अंगांत फुरफुरे, मुखें झळकलीं तेजांनीं।
'मारूं किंवा मरूं' प्रतिज्ञा केली सगळ्या शूरांनीं॥

वीरांच्या मुठि वळती वीर्यें, बाहु तयांचे प्रस्फुरती ।
क्रोधाग्नीही हृदयिं धडपडे, ठिणग्या नयनांतुनि पडती ॥

वीरश्रेणी चाले भरभर, उठती मधुनी जयघोष ।
धूळीचा हा लोट उसळला, मळले त्यानें रणवेष ॥

अस्मानातें भिडले जाउनि धूली-कण, हो कल्लोळ ।
भूमी, नभ हे एक जाहले, खड्ग-वीज चमके चपल ॥

चपला घेउनि ही घनमाला गर्जन-जयघोषा करित ।
अरिसेनेवरि पहा चालली स्वराज्य-झेंडा फडकवित ! ॥

—स. र. पंतसचिव

# १९ चोरी

—+:*:+—

" असशि चोरटी किति तूं कमले ! शोभे ना तुज हें ।
विश्वसलों मी तुजवरि म्हणुनी देसी का फल हें ! ॥ "

निजनाथाचें वचन परिसुनी अंतरिं घाबरली ।
काय चोरलें तिज स्मरेना, वृत्ती बावरली ॥

नयनशुक्तितुनि गालांवरती मौक्तिक ओघळले ।
सन्निध जाउनि निजनाथाचे चरण-कमल धरिले ॥

स्फुंद स्फुंदुनि बोले बाला, " असत्य किति वदतां ! ।
दिसें भाबडी तुम्हांस नाथा, म्हणुनि असें छळतां ! ॥

आजवरी मीं केली नाहीं कसलीही चोरी ।
कठोर असली वाणी तुमची जाते जिव्हारीं ॥

खास कुणी तरि कालकूट तें कानीं ओतियलें ।
सांगा नाथा, पदर पसरतें, शरण तुम्हां आलें ! " ॥

प्रेमें घेई जवळ तिज म्हणे, " वेडी खचित सये, ।
सांग चोरिलें नाहिं काय तूं मम हृदया सखये ! " ॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

## २० गवाक्षांतील सुंदरीस !

शून्यमुखीं बघशी गगनीं ।
मज सांग सांग तव काय मनीं ! ॥ ध्रु० ॥

पायापाशीं बसे शाहिर
ह्द्वीणेवरि धरितो सूर
राग आळवी तुझा निरंतर,
बोल त्याशिं तूं मधुवचनीं
मज सांग सांग तव काय मनीं ! १

तव विरहीं अशनाला टाकी,
अश्रू जमले नेत्र-तटाकीं,
ध्यास लागला तुझाच देखीं,
दया येउं दे विलासिनी !
मज सांग सांग तव काय मनीं ! २

निःश्वासांनीं रचिलीं गीतें
नटलीं प्रीतीच्या संगीतें,
तुझ्याच वर्णियलें कीर्तीतें,
रुसवा कां हा फिरफिरुनी ?
मज सांग सांग तव काय मनीं ! ३

वायु वाहतो तुझ्याच कवना,
भृंग गुंग त्वत्स्वरूपगाना,
केली कविंनीं तुजवर रचना,
रोष असा कां दासजनीं ?
मज सांग सांग तव काय मनीं ! ४

—स. र. पंतसचिव

# २१ आळवणी



( चाल—चंद्र चवथिचा० )

हृदयरंजना !
प्राणजीवना !
चरण-कमल दाखवुनी रिझवि मन्मना ॥

नाहिं आसरा
जीव बावरा
होय जलाविण जसा मीन घाबरा ॥

मधुर बांसरी
वाजवी हरी !
अधिर ऐकण्यास सख्या ! फार अन्तरीं ॥

प्रेम दाविसी
हृदय चोरिशी
भुरळ पुरी घालुनियां पाडिशी फशीं ॥

धीर साहिना
पळभरी मना
व्याकुळ मी दर्शन दे त्वरित मोहना ! ॥

वंचना पुरे
राग सोडिं रे
तृषिता मी, प्रेम-मेघ काय ओसरे ? ॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

## २२ विसरिन कैंवि तुला ?

( चाल—पांखरा, येशिल का परतून ? )

जग उफराटें फिरलें जरि हें विस्मृति हो न मला,
राजसे, विसरिन कैंवि तुला ? ॥ ध्रु० ॥

दूर विदेशीं कुठें राहिलों,
गिरि-सरितांनीं जरि वेढियलों,
जनपरिवारीं जरी रंगलों,
तरि करिं स्मरणाला । राजसे, विसरिन कैंवि तुला ? ॥

कुठेंहि जातां गगन बरोबर
तशी तुझी मनिं मूर्ति मनोहर,
त्वन्नामानें भरे मदन्तर
नाहिं विसर पडला । राजसे, विसरिन कैंवि तुला ? ॥

भालावरचे केंस सांवरीं
पदर गळाला तोहि आवरीं
त्वन्मुखिं रमतां दृष्टि बावरी
आठविं समयाला । राजसे, विसरिन कैंवि तुला ? ॥

गुह्य सांठलें ओष्ठांमध्यें
प्रेम दाटलें नेत्रांमध्यें
गान खेळलें मूकामध्यें
वाव कसा दिधला ! । राजसे, विसरिन कैंवि तुला ? ॥

युगायुगान्तरिं हृदयिं कोंडुनी
ठेविन तुझि ही प्रतिमा रेखुनी
काळ पुसाया शक्त न इथुनी
जडली चित्ताला। राजसे, विसरिन केंवि तुला ?॥

'आवरणें' देहांना गणती
किती जरी तीं फाटुनि जातीं
"अमर राहतो आत्मा" म्हणती
तेंवी तूं विमला। राजसे, विसरिन केंवि तुला ?॥

—स. र. पंतसचिव

## २३ रति

—+:*:+—

घडवीं शिल्पिवरा !
आतां, लाविशि कां उशिरा ? ॥ धृ० ॥

बसलें मी किति वेळां ऐशी,
निरखुनि अजुनी किति किति बघशी !
कल्पना तुला न सुचे कैशी ?
विलंब हा न बरा,
आतां, लाविशि कां उशिरा ? ॥ १ ॥

नांव तुझें जगीं बहु दुमदुमतें,
तव विख्याती ऐकत होतें,
म्हणुनिच मूर्तीसाठीं बसतें,
व्यर्थ कीर्ति नृ-वरा !
आतां, लाविशि कां उशिरा ! ॥ २ ॥

कोमल कल्पकता बुद्धीची,
अपूर्व चतुराई हाताची,
आज लोपली कोठें साची ?
मोहित बुद्धि नरा !
आतां, लाविशि कां उशिरा ? ॥ ३ ॥

'रति' मूर्तीकरितां निवडोनी
पाचारिशि मज स्वयें येउनी,
'बघूं तुझी चतुराई' म्हणुनी

तुझिया येत घरा,
आतां, लाविशि कां उशिरा ? ॥ ४ ॥

विमोहुनीयां जाइ त्वन्मती
भासशि मजला निश्चल मूर्ती,
'घडवि कुणाची कोण आकृती'
मोह पडेल परा,
आतां, लाविशि कां उशिरा ? ॥ ५ ॥

वागशि मजशीं समजुनि 'स्वामी',
सामान्य स्त्री आहें का मी ?
त्वदर्थ ना मी आलें धामीं ?
सोडुनि विनय जरा,
आतां, लाविशि कां उशिरा ? ॥ ६ ॥

अर्धं अंग मीं उघडें केलें,
मूर्तीसाठीं म्हणुनी बसलें,
शिशिरें रोमांचित किति झालें।
संपावि 'रति' चतुरा !
आतां, लाविशि कां उशिरा ? ॥ ७ ॥

करांत माझ्या फल अर्पुनियां
गुंतविशी तूं मज या ठायां,
वेळ किती घालविशी वाया,
आवरिं नयनशरा
आतां, लाविशि कां उशिरा ? ॥ ८ ॥

बघशी मजला अतृप्त नयनीं,
आरंभहि ना मूर्तिस अजुनी,
गेलें बाई ताटकळोनी,

जाऊं काय घरा?
आतां, लाविशि कां उशिरा? ॥ ९ ॥

जीवन निर्जीवा देणारा,
सौंदर्याला वाढविणारा,
अमरपदीं जो मज नेणारा,
ये कां स्थैर्य करा?
आतां, लाविशि कां उशिरा? ॥ १० ॥

घडण करोनी ह्या मूर्तींची
प्रचीति दाखविं कौशल्याची,
पुरविन इच्छा मग तव मनिंची,
कळला हेतु पुरा,
आतां, लाविशि कां उशिरा? ॥ ११ ॥

—स. र. पंतसचिव

# २४ विकल्प

“ कुठें चालली थाट करोनी स्वारी या वेळीं ।
वेळिं-अवेळीं हिंडायाची संवय तुम्हां जडली ॥

काय बोलतें, लक्ष नाहिं ना?—ठाउक हें मातें ।
नेहमिचें हें वर्तन असलें—मीच कशी जातें!” ॥

“ थांब, रागवूं नको सखे तूं, होतों नादांत ।
ड्रेस करोनी थाटाचा मी पाहाया जात ॥

चित्ताकर्षक असे सखे ती, सुचे न मज काज ।
तिच्याविषयिंच्या करित कल्पना बसलों मी आज ॥

प्रेमा तुजवरि असे, परी तूं आज तुच्छ मजसी ।
तिज विषयीं मी अधीर झालों, कोपें कां बघसी? ॥

नाद नसे मज दुसरा कसला, आवड तिचि भारी ।
तिज बघतांना आनंदानें फुलुनी मन जाई ॥

जळफळशी कां? होय, समजलों, वेडी तूं साच ।
जात असें मी बघावयाला ती ‘टेनिस-मॅच’ ॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

# २५ खरडलेली कविता

( चाल—वसंतीं बघुनि मेनकेला० )

तुजविणें कंठूं दिन कैसे ?
झालें सारें शून्य जगत हें, लागे मजसि पिसें ॥

केधवां भेट मला देसी ?
व्याकुल झालें हृदय तुजविणें, कां ऐसें छळिसी ! ॥

किती ही निष्ठुरता धरिसी !
मना यातना देसी नाथा ! शोभे ना तुजसी ॥

दाविलें प्रेम पूर्वि मजसी
परि दिसतां मी भोळी तुजला, फशीं पाडिलेंसी ॥

शब्द का हाच राखलासी ?
' सोडुनि तुजला नच राहिन मी ' ऐसें वदलासी ॥

उघडुनि हृदय कुणा दावूं ?
हृदयीं चाले तळमळ सखया, कुणापुढें गाऊं ? ॥

बरें तें मरण मला वाटे
भयद एकलें जीवन खचितचि मरणाहुनि खोटें ! ॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

## २६ तऱ्हा वेगळी ह्या प्रेमाची—

( चाल—चंद्रकान्त राजाची० )

माहित नव्हते स्मरराजाचे खेळ नवोनव हे ।
पुष्पासम मी विहरत होतें—निराशंक राहें ! ॥
प्रेमाची मज दीक्षा दिधली मदनमान्त्रिकानें ।
भारुनियां मज पुरुष बांधि हा प्रेमळ पाशानें ॥
'प्रेम', 'प्रेम' मज ठाउक नव्हतें असल्या रीतींचें ।
परि बाई मज वेड लाविलें त्यानें प्रेमाचें ॥

जवळ बसावा मजसन्निध हा सतत मला वाटे ।
जातां निघुनी नेत्रांमध्यें अश्रुपूर दाटे ॥

जवळ बैसुनी पाठीवरुनी कर फिरवित राहे ।
नितान्तसौख्या मूकवदन मी उपभोगित राहें ॥

मधु वदनांतिल लुटुनी लोचट हंसत बघत राही ।
जुलुम किति हा अधरांवरती ! राग मला येई ॥
घेई पटपट कितीं चुंबनें माझ्या वदनाचीं ।
गणती कसली अगणित प्रेमीं होइ चुंबनांची ! ॥
हातामधल्या पदरानें मीं तोंड पुसुनि बोलें, ।
"ताळ सोडला आपण अगदीं ! वर्तन हें कसलें !!" ॥
आईबाबा यांचें होतें प्रेम मला विदित ।
परि मी कधिंही अश्रुसिंचना होतें ना करित ॥

तऱ्हा वेगळी ह्या प्रेमाची—चुटपुट मनिं वाटे ! ।
शून्य भासतें जग त्यांच्याविण, प्रेम न कधिं आटे !! ॥

—प्र. र. पंतसचिव

# २७ प्रेमाच्या तीन अवस्था

[ दर्शन, सान्निध्य आणि एकरूपता ]

देहाच्या जैशा तीन अवस्था असती ।
तैशाच जगामाधिं प्रेमाच्याही दिसती ॥

युवयुवति प्रथम जैं परस्परांना बघती ।
सौंदर्य विलोकुनि एकमेक बावरती ॥

अनुरक्त होउनी चोरुनि दोघें बघती ।
मग दृष्टिक्षेपें मूकभाषणा करिती ॥

हृदयिंचा समजतां परस्परांना भाव ।
नावरे त्यांस मन, घेइ दर्शना धांव ॥

या अशा रीतिनें जातां कांहीं काळ ।
नच तोषविती त्यां मुके स्मितात्मक बोल ॥

मग दोघांच्याही गांठी भेटी होती ।
सहवासिं रंगुनी मित संभाषण करिती ॥

संकोच हळुहळू कमीकमी मग होई ।
दोघांच्यावांचुनि दोघां करमत नाहीं ॥

बहु आनंदानें काळ जाइ दोघांचा ।
भूवरी उतरला वाटे स्वर्गच साचा ॥

भेटती, बोलती, वेडीं दोघें होतीं ।
मनिं नकळत त्यांच्या प्रेमांकुर उद्भवती ॥

गुजगोष्टी करिती प्रेमभाव मनिं दाटे।
त्यापुढें अखिल जग तुच्छ तयांना वाटे ॥

पळभरी साहवे विरह न एकामेकां।
जणुं 'लैलामज्नू' गमती सर्वां लोकां ॥

कधिं रुसती फुगती अबोलाहि कधिं धरिती।
परि दर्शन घडतां सर्व राग विस्मरती ॥

ऐशाच प्रीतिच्या नाना लीला करिती।
बोलती किती तरि नाहीं त्याला गणती ॥

जनरूपी कांटे प्रेमामध्यें असती।
मधिंमधीं येउनी वियोग त्या घडवीती ॥

'प्रेम हें काय,' मी सांगुं कसें सकलांना ?।
जाणतील त्याचा अनुभव आहे ज्यांना ! ॥

परि पुढें हेंहि सांनिध्य अपुरें वाटे।
सर्वदा असावें निकट तयांना वाटे ॥

मग देव-ब्राह्मणांदेखत शुभ समयाला।
लावुनी विवाहा जोडिति परस्परांला ॥

सहधर्मचारिं तीं अपूर्वसुख अनुभविती।
अद्वैतभावना हृदिं त्यांच्या दृढ होती।

जरि दोन शरीरें सर्व जनांना दिसतीं।
परि हृदयें त्यांचीं एकरूपता वरितीं ! ॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

# २८ हट्टी मन

[ चाल—सरल वृत्तिची सरलमनाची० ]

प्रेम सारखें हृदय-तुरुंगीं कोंडुनि ठेवियलें ।
सख्या ! कुणाला नच केव्हांही समजुनियां दिधलें ॥

नयन न धाले कधिंही, बघण्या उत्सुक किति झाले ।
त्याच क्षणिं मीं थांबाविलें त्यां जरि भरुनी आले ॥

तुज भेटाया पाय सरकती पुढती वेगानें ।
आज्ञा करुनी त्यांस फिरविलें मागें कष्टानें ॥

सुखित होउनी हंसूं येतसे मूर्ती तव दिसतां ।
दृष्टि फिरवितें तरिही बाई ये ना आवरितां ॥

अधर स्फुरती सुधा सेवण्या, शोष जिवा पडला ।
'दुर्लभ अमृत' असें पटविलें वेड्या चित्ताला ॥

आलिंगाया आतुर होती बाहु सदा राया ।
सहस्र यत्ना सतत करोनी आवरिली काया ॥

हृदयामधुनी शब्द भरभरा येती ओठांत ।
तेथुनि परतवितें मी त्यांना फिरुनी हृदयांत ॥

सर्व इंद्रियें झगडतिं जेव्हां उत्सुक होवोनी ।
मनास माझ्या तदा रिझवितें गाणें गावोनी ! ॥

—स. र. पंतसचिव

## २९ दुर्दिन

[ एका हताश मनुष्याची मनःस्थिति वर्णन केली आहे ]

नभ भरलें सारें कृष्णवर्ण मेघांनीं ।
पसरली आयुवरि जणूं निराशा-रजनी ॥

अंधार गुहेंतिल काय संकलित झाला ।
मम आयुष्याचा पुढिल मार्ग झांकियला ! ॥

अंगास झोंबतें वारें चहुंबाजूंनीं ।
कीं जननिंदा ये दुःसह माझ्या कानीं ॥

नसनसा थरारति झोंबे अंगा वारें ।
जाणार आयु कां असेंच माझें सारें ! ॥

हा समीर हालवि प्रचंड वृक्षा वेगें ।
जणुं पर्णांचा हा समुद्र खवळे रागें ॥

मम हृदयाची जणुं वृक्ष करितसे साथ ।
हे विचार-झंझावात पसरतां तेथ ॥

सरिवरती येती सरि ह्या पर्जन्याच्या ।
दुःखास वर्षिती दूती नैराश्याच्या ॥

कडकडति नभान्तरिं चपला आनंदानें ।
मम शरीर कांपे थरथर तें भीतीनें ॥

मम मनःस्थितीला सृष्टि दिसे अनुकूल ।
भीषणता वाढे होतां सायंकाल ॥

ही आली जाया शिवालयाला दारीं ।
ही नूतन प्रतिभा माझ्या दुःखा वारी ॥

जणुं चित्क्षोभाचीं पटलें सारित दूर ।
ही संध्या उधळित येत गुलाल अबीर ॥

पसरली कपोलावरती हंसरी सांज ।
मम हृदयीं चढवी वाला प्रीती-साज ॥

—मग हांसत गेलों करांत कर गुंफोनी ।
मस्तकें ठेविलीं पिंडिवरी दोघांनीं ॥

मनिं भक्तिरसाचे वाहत असतां पाट ।
मनुज कां द्यावी चित्क्षोभाला वाट ? ॥

—स. र. पंतसचिव

# ३० अनुतापांत

[ प्रिय पत्नीचा त्याग केल्यानंतर तिच्या पतीस झालेला पश्चात्ताप ]

( अभंग )

तुजसी सोडून। येई मी निघून।
आपण होऊन। एकाएकी ॥

प्रेमा सोडीयला। अवमान केला।
खर शब्दशरा। सोडीयले ॥

खोट्या सुखाशेनें। तुजसि त्याजिलें।
कांहीं न वाटलें। माझ्या मना ॥

निर्मल मनाची। प्रेमळ जीवाची।
शरीर व्याधींत। सोडी तूंतें ॥

पूर्वसंचिताचें। देणें घेणें होई।
जन्मांत या येई। भोगावया ॥

माझी ग्रहदशा। मजासि छळिते।
तुजासि गांजिते। माझ्या हातीं ॥

डोळीं अश्रू ठेले। तरी न मानिले।
चित्त न द्रवलें। माझें क्षण ॥

हृदयीं उमाळा। बोलशी वचाला।
तरी न मनाला॥ पीळ पडे ॥

ईश्वरानें जरी । तुज दिली वाणी ।
पाझर न आणी । हृदयाला ॥

ज्ञान एवढेंसें । सिंधुमध्यें बिंदु ।
तुज दीनबंधू । बोलवीतो ॥

तुझी विनवणा । निश्चयानें झणीं ।
आणिलहो पाणी । दगडाला ॥

परी मन माझें । त्याहुनी कठिण ।
पळहि द्रव न । आला तया ॥

देवते, देवते । तुजसीं छळिलें ।
अजुनी न झालें । शान्त मन ॥

वृथा दोष दिला । वृथा रोष केला ।
वृथा नाश केला । माझा मींच ॥

'विपत्काळ येतां । सोडोनिया जाती ।
सर्व नातीं गोतीं' । लोकीं भाण ॥

तेंचि सत्य वाटे । मींही हेंच केलें ।
परी पस्तावलें । नाहीं मन ॥

शरीर व्याधींत । असतां गांजत ।
सोडोनीया तूंस । आलों येथें ॥

दीनवाणी दृष्टी । असवांची वृष्टी ।
आठवानी कष्टी । मन होतें ॥

क्षमा करावया । दया प्रेम ठेवा ।
कधीं न अटावा । तुझ्या ठायीं ॥

कधीं काळीं होतां । मज अनुताप ।
तव हृदयांत । ठाव देई ॥

दिव्य तव प्रेमा । मज अभाग्याला ।
भाग्यानें लाभला । जगांत या ॥

मागशी देवाशीं । ‘प्रीति कमी व्हावी ।
माझी न कधींही । नाथाठायीं’ ॥

प्रेमाची भुकेली । कधीं न मागशी ।
मागणें देवाशीं । ‘प्रेम माझें’ ॥

निःस्वार्थी प्रेमाची । तूंच मंत्रदात्री ।
कोठेंही जगतीं । आढळेना ॥

हाय हाय सखे । मज उद्धराया ।
साहशी दुःखा या । नानाविध ॥

तव जनकानें । पदरीं घालोनी ।
मज विनवीलें । ‘सांभाळा ही’ ॥

हाय परि भाग्य । माझें थोर नाहीं ।
तुज दुःखडोहीं । लोटिलें म्यां ॥

तुझ्या मीं जन्माची । राखरांगोळी गे ।
केली केली सांगें । खरेंच ना ॥

जाणून बुजून । तुजसी छळिलें ।
अखेर त्यजिले । काय झालें ॥

लाही लाही होई । शरीरांत आंत ।
भोगीं दिनरात । अग्नियोग ॥

खोट्या मायाजालीं । गुंतत राहीलों ।
नाहीं पस्तावलों । पुरतेपणीं ॥

पश्चात्ताप माझा । वाटे हा क्षणाचा ।
पगडा पापाचा । बैसे मग ॥

पापाचा कीटक। पापांत गुंतला।
धनीपणा आला। पापाचाच॥

पापाचे हे घडे। रिकामे अद्यापी।
तंव पाप दापी। माझ्या मना॥

भरूं दे हे घडे। तोंवरी न घडे।
स्मरणाचे धडे। तुझे देवी॥

जन्मांत या नाहीं। सौख्य होणें तूंतें।
तूंच कारणातें। ओळखसी॥

मागें परतणें। शक्य नाहीं आतां।
त्याग हा एकदां। झाला झाला॥

पुढील जन्मांत। तुजासि सेवून।
पापें निस्तरीन। निश्चयानें॥

या जन्मींचें हें नातें। बोलतां ना येई।
वाहूं कैसें 'आई'। जन्मांत या॥

प्रेम तुझें वाटे। आईचें बाळासीं।
हांकारूं तुजसी। 'आई' कैसें॥

पुढील जन्मांत। तुझ्या पोटीं येतां।
देह सार्थकता। घडेलची॥

तुज सुखवोनी। तुजासि सेवूनी।
नर-कुडींतुनी। सुटेन मी॥

वदूं काय तूंतें। मन्मन जाणिसी।
वाचा खुंटे ऐसी। एकाएकीं॥

—स. र. पंतसचिव

# ३१ आगमन

—+++*+++—

[ चाल—केशवकरणी० ]

करकमलावर वदन ठेवुनी बाला बसली निशीं ।
कोणाची तरि वाट बघे ती उत्सुकतेनें अशी ! ॥

सरल वृत्तिची असुनी—चित्तें विशुद्ध गंगेपरी ।
हास्य मुखावरि खेळत होतें मधुर बालकापरी ॥

आकाशाला दृष्टि लाविली सहज तियेनें वरी ।
नभही होतें निरभ्र सारें सखिच्या हृदयापरी ॥

वाट बघोनी थकली, सुकुनी गेली तन्मुखकळी ।
नैराश्यानें दुःखित होवुनि उदासीन जाहली ॥

तोंचि, व्यापलें नभ मेघांनीं अभ्रें आलीं वरी ।
सर्वहि काळें गगन जाहलें निराश चित्तापरी ॥

वेळ लागला यावयासि कां ? उमज तिला ना पडे ।
नाना शंका मनांत येवुनि हृदय तिचें धडधडे ॥

तोंचि गडगडे गगनीं सुचवी पडेल पाउस निशीं ।
चमकुनि झटकन वीजहि जाई भयभित तरुणी जशी ॥

तोंचि वाजलें दार म्हणोनी वळुनि तिनें पाहिलें ।
प्रियपति दिसतां आनंदाश्रू नयनान्तरिं दाटले ॥

शंका गेल्या साऱ्या झालें वदन पुन्हां हांसरें ।
आनंदानें खुलली मनिंचें दुःख तिच्या ओसरे ॥

वृष्टी झाली पर्जन्याची खळखळ जल पाझरे।
प्रियपतिहृदयीं रमणी रमली, दुःख कोठलें उरे?॥

पर्जन्याची वृष्टी होई येती सरिवरि सरी।
वृष्टि थांबतां गगन जाहलें निरभ्र पूर्वीपरी॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

# ३२ शिल्पकार*

[ चालः—हरिची भगिनी म्हणे सुभद्रा० ]

संगमरवरी पुतळा निशिदिनिं कष्ट घेउनी बनवीला।
एकान्तप्रिय शिल्पकार मग तद्रूपीं रंगुनि गेला॥

'जन नच कोणी भेटावें' ही इच्छा त्याच्या चित्तांत।
पुतळा घडवी कल्पकतेनें हृदय ओतुनी त्याच्यांत॥

हृदयामधल्या कोमल मोहक रची भावना मूर्तींत।
भान लोपलें जगाविषयिचें, चित्त गुंतलें त्याच्यांत॥

भावनामया करणी बनली, भावनाहि तन्मय झाली।
मनांत खेळवलेल्या स्त्रीला मूर्तीरूपा आणियली॥

जन येती जे शिल्पक-गेहीं वानिति तिजला प्रेमानें।
निर्माता जन-हृदयाकर्षक झाला मग हा यापरिनें॥

शिल्पक प्रीती तिजवर वितरी त्यास कुठेंही करमेना।
संनिध तीच्या सहवासप्रिय बसे न कोठें जाईना॥

गुलगुल गोष्टी तिजसह बोले, भान न राही देहाचें।
ध्यास लागला निजकृतिचा त्या, वेड लागलें प्रेमाचें॥

स्फुंदुनि स्फुंदुनि रडे बिचारा प्रेमकहाणी कथी तिला।
बाहूंमध्यें घेउनि तिजला हृदया जडवी हृदयाला॥

---

* पाश्चात्य पुराणांतील Pygmalion नांवाच्या मूर्तिकाराच्या गोष्टी-वरून सुचलेली कविता. M.1422.

तद्वक्षीं निजमस्तक अर्पुनि बसे कल्पनासम्राट।
अश्रु काठिनवक्षावरि गळतां तत्कान्ती धुवुनी जात॥

एके दिवशीं दृषद्-रमाणिला हृदयीं घेउनि हा बैसे।
चमत्कार जाहला, वाटतें ईश गहिंवरे दया-रसें!॥

प्रतिमा-वक्षःस्थल निःश्वासें हलूं लागलें--त्या भासें।
तत्हृदयध्वनि निजहृदयान्तरिं ऐकाया त्या येत असे॥

बाहूंमध्यें सांपडलेली हळु हळु हाले प्रतिमा ती।
मिठी मारिली तिनें शिल्पका झाली त्याची स्तिमित मती॥

नेम ईश्वरी अपूर्व असला कसा कळावा नर-मतिला!।
कोठुनि केव्हां किंवा कैशी दया येतसे ईशाला!!॥

रूपसुंदरा प्रस्तरमूर्ती भावनामया कशि झाली!।
शिल्पकार-भावना-तरंगीं सजीव हाले वेल्हाळी!॥

सकल आयुचें सार्थक झालें, श्रमास त्याच्या फळ येई।
जीवनांतल्या पुण्यबिंदुचा अफाट सागर जणुं होई॥

दृषद्-कुमारी—नव्हे नव्हे ही सजीव लागे बोलाया।
"प्रेम वितरता अभागिनीवरि अमोल ऐसें कां राया?॥

शापभ्रष्टा होउनि आलें जगीं अल्पक्षण निवसाया।
स्थान हेंचि मज योग्य वाटुनी प्रवेशिली मग ही काया॥

हाय! हाय! परि तुमचें बसलें मूर्तीवरती ह्याच मन।
क्षणभर घडला परिचय तुमचा, आतां जाणें सोडून!!"॥

"अखंड तव सहवासिं असावें, सखये, जीवनहेतू हा।
तुजविण जगतीं, असार जगतीं, जीव नको क्षणही देहा॥

आयुष्यांतिल क्षणक्षण वेंचुनि तुझ्याचसाठीं घालविले।
मद्भाग्यें तूं सजीव झालिस—आत्म्याचें सार्थक झालें!॥

मदश्रुपातें जीवनशक्ती तवान्तरंगीं संचरली।
मन्निःश्वासें श्वास तुझा हा वाहुं लागला भुवनतलीं॥

अश्रु दवडुनी कविवर निर्मिति प्रियेस परि ते काव्यांत।
भाग्यवान किति शिल्पक त्यांना आकृति देतो जगतांत!॥

तुझ्याबरोबर जीवन आतां माझ्या देहांतिल जावो।
तूंच तूंच अंतरीं विसांवा, त्वद्रूपान्तरिं लय होवो!"॥

"मलाहि वाटे अपूर्ण जगिं या कशास वसतां राया हो।
प्रेम अढळ तव मजवरती जर प्रेम-प्रभु अमुचा राहो!॥

प्रीतीनेंही मुक्ति मिळविती; स्वर्गी मजसह चला चला।
अपूर्णतायुत संसाराला धिक्कारुनि या जगताला!"॥

*　　　　*　　　　*

अन्यादिनीं मग नितान्तशान्ती भरली शिल्पक-गेहांत।
गेले तेथें जन देखाया—दिसलें तेथें परि शान्त!॥

दृषदबलेच्या बाहूंमध्यें पुतळा पुरुषाकृति दिसला।
रूप शिल्पकासमान होतें, प्रत्यक्षासम तो गमला॥

पृच्छा करिती एकामेकां, "कोठें शिल्पक गेला हा।
दृषद्रमणिच्या बाहूंमध्यें स्वतां घडवुनी निजदेहा?"॥

—स. र. पंतसचिव

# ३३ आशा

जेव्हां मी तुज पाहतों, मज गमे, भेटेन स्वप्नीं तुला,
त्वत्संपर्कज पूर्ण तोष परि तो भोगीन काव्यांतला।

भेटीची हुरहूर नित्य जडली—अज्ञात आशा मला!
काव्यानेंच तुला समीप करणें हा मार्ग हातांतला!॥

निद्रेमाजिं सुहास्ययुक्त सुचिरें, मूर्ती तुझी पाहिली
स्वप्नीं येउनि तूं मला सुखविण्या युक्ती अशी योजिली।

सृष्टीमाजिं अशक्य सर्व असतें, स्वप्नांत सीमा नसे!
स्वप्नीं, काव्यिं तुला सदा मिळवितों, येथें कधीं ना फसे॥

भूपृष्ठांत जधीं निदाघसमयीं पर्जन्यवृष्टी झडे
काळे भिन्न नभांत मेघ जमती, जें चंद्रमाही दडे।

धारापात पहावयास सुचिरें, जाशा गवाक्षीं तधीं
—वाटे, अक्षय राज्य संतत करी हा चंद्र चित्तामधीं॥

पाठीमागुनि येउनी कर तुझ्या खांद्यावरी ठेउनी।
मी सांगेन निजव्यथा हृदयिंची प्रेमाश्रुंनीं न्हाउनी!॥

—स. र. पंतसचिव

# ३४ पुष्पास !

—+++*+++—

[ चालः—आम्रमंजिरी तशी गोजिरी० ]

सरल वृत्तिची, सरल मनाची, अजाण वनहरणी ।
फुलामुलांची बालिश-मूर्ती, ये मन्मनहारिणी ॥
नामसार्थता तुझेच ठायीं साफल्या पावे ।
क्षणांत वदता कटु वचनांनीं सुकोनियां जावें ॥
प्रभातकालीं दैवप्रीतिनें हर्षभरित व्हावें ।
वेलीमाता-अंकावरती दिना घालवावें ॥
दुःखाची क्षण झुळुकहि तुजला कधीं न लागावी ।
ईशापाशीं पुष्पा ! विनवीं—आशी ही द्यावी ॥
तुजसाठीं जें मनांत वाटे तुला न समजावें ।
मनिंचें हितगुज मनांत माझ्या विरोनियां जावें ॥
स्वार्थी प्रीती नुमजे तुजला खोट्या जगताची ।
अजाण पुष्पा ! जगांत मीही असेन तसलाची ॥
आनंदानें प्रेमानें तूं गात सदा जावें ! ।
स्वगुण-सुवासें चलाचलांना वनांत झुलवावें ॥
प्रफुल्ल पुष्पा ! तुझी टवटवी अशी सदा राहो ! ।
जग-तापें ती काधिं न सुकावी !—मनिंचा हा लाहो ! ॥
परी म्लानता पुष्पा ! वरिशी नलिनी-दलजालीं ।
तुज देखुनि ही हर्षित सृष्टी सुकोनियां गेली ॥
नटव्या जगता त्वदीय न कळे प्रीती स्वर्गीय ।
अजाण मानव कविला पुष्पा ! कशी असे गेय ? ॥

त्वद्गुणगंधा नच तव रूपा भृंग येइ भुलुनी।
अव्हेर त्याचा करूं नको तूं—होइल खिन्न मनीं ! ॥

गुणपासंगा त्वदीय नाहीं आलि हा येणार।
कठोर, निर्गुण भ्रमत भ्रमर हा मनांत झुरणार ! ॥

मधु चाखाया नच हा येई सुवासगुणलुब्ध।
नको, राहुं दे प्रीति तयाची मनिंची मनिं स्तब्ध ! ॥

सदासर्वदा सुखांत गानीं गुंगुनियां जावें।
आशा बांधी भ्रमर सदा ही—म्लान कधिं न व्हावें ॥

हृदयाची ना जाणिव जगता; मति कष्टी झाली।
परते येथुन; पुष्पा ! येइल भ्रमर न कधिं जवळी ! ॥

उभ्या जगाची आकांक्षा तव सफूर्त व्हायाची।
अतांच सुकणें यापरि न रुचे मातें केव्हांची ॥

लता-सुमाता तुझ्याचसाठीं पाहीं दिन कंठी।
सुखदुःखाच्या ज्याच्या त्याच्या असती या गांठी ! ॥

तुज पतिदेवाचरणीं द्याया झटते तव माता।
हाय ! हाय ! मी कशास येऊं यामध्यें आतां ! ॥

कुठेंहि राही, सुखांत राही, दुसरि न मज आशा।
चपला चमके नभांत दीप्ती जाई झणि नाशा ! ॥

तुज वाहुनि पति-देवा, होइल माता धन्य अशी।
सार्थक होतां तव देहाचें सुख होइल मजसीं ! ॥

× × × ×

निःश्वासांनीं रचिलीं गीतें—काय इथें माझें ?।
वाचुनि वाचुनि तीं तीं फिरुनी माझें चित्त रिझे ! ॥

—स. र. पंतसचिव

## ३५ पर-पुरुष

गणगोताची आशा सरली संसाराला हात धुतले ।
जीव घेवो लग्नाचे नवरे पर-पुरुषीं हें मन रतलें ॥

—परशराम

( चालः—दासि ऐसें मानुनियां० )

गोड गोड बोलुनियां मन माझें चाळाविलें ।
पतिपासुनि तोडुनियां निजठायीं गुंतविलें ! ॥ ध्रु० ॥

पतिपाशीं रत होतें, संसारीं गोडि वसे ।
मधुरवाणि परिसुनि परि मी, बाई, गोंधळलें ! ॥

पतिचें बंधन नडलें, 'मी 'पण सासू दापी ।
मुक्ति शीळ ऐकुनियां रात्रीं किति बावरलें ॥

पांघरुणें मायेचीं दूर सारिलीं हलकें ।
पतिमंचक सोडुनियां 'सावधान' मी उठलें ! ॥

भीति-केश आंवरुनी पर-पुरुषाकुलचित्ता ।
उशि ठेविलि मम जागीं—पतिराजा चकवीलें ॥

गर्व-पाउलांचा ना केला आवाज मुळीं ।
लोभ-पाटल्यांना मीं मुळि नाहीं वाजविलें ॥

भ्रम-निद्रेमाजि पती, पर-पुरुषीं रत जाया ।
मूढा त्या नाकळलें—'संसारांतुन उठलें' ! ॥

ज्ञान-दार जें खिळलें उघडीलें हळु हळु तें ।
अभिसारा उत्सुक मी दारामधुनी गेलें ॥

दास्याचा उंबरठा ओलांडीं मी मुक्ता ।
बाहू मी उभवोनी रमणाच्या गळिं पडलें ॥

देहाचा विसर पडे भीति-लाज सोडियली ।
पतिला मग कोण पुसे ? पर-पुरुषा ! तुज भुललें ! ॥

—स. र. पंतसचिव

## ३६ शीर्णपुष्प

—+++*+++—

[ राग—कालिंगडा; ताल—दादरा. ]

( चाल—रामनाम भजन करो० )

सखया ! हृद्या त्याजिसी तुडवुनि निर्दयपायीं ।
शीर्ण पुष्प सोडुनियां जेंवि मधुप दुरि जाई ॥

हाय ! हाय ! काय असा सौख्यभाग संपला ! ।
हृदय बधिर तव होई, प्रेमसूर्य लोपला ॥

भेट तुझी या पुढतीं होइल मज सांग कशी ।
प्रेमाग्नित पडलें मी नादीं लागून फशीं ! ॥

चित्त तुझें बघ रिझतें कोठेंही स्वैर जगीं ।
कर्तव्यें तुजपुढती रोज उभीं नित्य नवीं ॥

हाय ! हाय ! कंठुं कशी दर्शनाविना दिना ।
नयनांनीं तुज पिउनी जगवितसें जीवना ! ॥

स्नान करित मी होतें, आला तव रव कानीं ।
ओलेत्यानें येई दर्शनार्थ अंगणीं ॥

निद्रावश जइं होशी अंकावरि तरि मजला—।
विरह तुझा भासतसे सांगुं किती कोमला ! ॥

आतां ह्या हृदयाची चिरविरहीं काय दशा ।
प्रीति-विषा प्राशुनियां तळमळतां कंठि निशा ! ॥

घन-भेरी गर्जतात, चमकति चपला गगनीं।
हृदय-कौमुदींत परी पूजीं तव मूर्ति मनीं॥

त्वद्दर्शनिं होइ मला मोद रोज रोज नवा।
सांग तुझी राधा ना?—भेट देइं माधवा!!॥

—स. र. पंतसचिव

# ३७ हिंद-रमणी !

—+++*+++—

[ पेशवाईतील एक तरुण म्हणतो. ]

( चाल—प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा० )

" हिंद्-रमणी !

शोकाकुल बघुनि तुला दुःख होतसे
गमविशि स्वातंत्र्य—उरीं भल्ल शिरतसें ! ॥

दुःखार्णव हृदिं खवळे पाहुनी तुला
परक्यांच्या जाशि करीं—जाण हेतुला ॥

स्थिति होइल तव कैशी ? बंध येत हा
जीवाला जडणारें दास्य ये महा ॥

माझी तूं आजवरी भासलें मला
हाय ! हाय ! दैव कसें घडवि गोष्टिला ! ॥

कोणि न तुज कधिं जिंकी वाटलें मला
विधिला प्रेमा खपला नाहिं आपुला ! ॥

शौर्य तुझें जाइ कसें लोपुनी अतां ?
हास्य-रवी मावळला दास्य उगवतां ! ॥

वीर-तती हळहळतें हिंदभूमि ! ही
हतबल हो, राजाची गुंतली सही ॥

उज्ज्वल तव तेज असे ! पूर्विं चमकलें !
मजसंगतिं चित्त तुझें किति सुखावलें ॥

मर्जि फिरे राजाची आज ती पुरी
   सोडुनियां जाणें येइ शत्रुच्या करीं ॥

कंठ भरे अश्रुजलें, काय मी करूं ?
   तुजविण संसार-नदी केंवि ही तरूं ? ॥

कालाची चक्रगती फिरतसे सदा !
   तोंवरि ही सहन करी कठिण आपदा ! ॥ ”

—स. र. पंतसचिव

# ३८ निसर्गहृदया

—+++*+++—

कड्यावरी जणुं असे खोपटें—दरी खोल तुटती जाई ।
सरसर ओहळ धांवति वेगें भिजवित दरडींतिल राई ॥

पुढें दिसावी नगराजी जणुं चित्रपटावरि रेंखियली ।
शिखरें ज्यांचीं पादपविरहित भेदुनि जातीं घनावली ॥

रांगारांगानें नग कोणीं कौशल्यानें मांडियले ? ।
धांवाया या वन्य निर्झरां सर्पाकृति कुणि सांगितलें ? ॥

खोपट्यांतुनी बाहिर यावें, स्तिमित बनावें बघुनी हें ।
निसर्गातलें दृश्य खरोखर महोदार भुलवीत राहे ! ॥

—उदारहृदये ! तुजासि पाहुनी यासम वृत्ती होय शुभे ! ।
हृदयांतिल तव स्वरूप बघुनी मला दिव्यता क्षण लाभे ! ! ॥

—प्र. र. पंतसचिव

# ३९ " खरा तो प्रेमा ना धरी लोभ मनीं "

[ चाल—चन्द्रकान्त राजाचो० ]

दोन मैत्रिणी बसल्या होत्या सांगत गुज कांहीं !
दोन जीव जणुं एक जहाले, भेदभाव नाहीं ॥

बोले पहिली दुसरीला, " तूं भोळी मज दिसशी ।
डावपेंच ते तुला पतीचे कैसे नच कळती ? ॥

दोन दिवस मी आलें येथें परि तें ओळखलें ।
प्रेम तुजवरी नाहीं सखये ! दुसरीवरि जडलें ॥

लक्षण नाहीं ठीक दिसत मज, होइल तव कैसें ? ।
वरिवरि करतो प्रेम तुजवरी, खुळे ! खपे कैसें ! ॥

कमला येतां घरीं आपुल्या करतो किति चाळे ।
बघे तिजकडे टक लावोनी मूक बोल बोले ॥

खुणा करिति तें एकामेकां हांसत पाहोनी ।
संधि पाहती बोलायातें कारण काढोनी ॥ "

शब्द परिसुनी अश्रु चमकले पत्नीच्या नयनीं ।
मैत्रिणीस परि दुःख न दावी, बोले ती हंसुनी ॥

" काय सांगशी विपरित सखये ! भासे मज खोटें ।
दुर्दैवें जरि खरें असे तें, दुःख न मज वाटें ॥

कारण आहे निर्लोभी मम त्यांवरती प्रेम ।
त्यांचें मजवरि असो नसो वा खंति न मनिं जाण ॥

देवघेव ना प्रेमामध्यें, मोबदला नाहीं।
मोबदल्याची इच्छा धरतां ‘ प्रेम ’ कसें होई !॥

तन-मन-धन मीं त्यां अर्पियलें शुभमंगलसमयीं।
ईशकृपेनें अढळ रहावें, आस न दुजि हृदयीं !”॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

# ४० आत्माहुति !



[ एक करुण कहाणी ]

( वृत्त—शिखरिणी )

बहू झाले होते दिवस बघुनी चित्त-रमणा
म्हणोनी राहे ती कशि तरि तदा कंठित दिना।
जरी साध्वीला या मधुप-हृदयें सोडुनि दिलें
तिनें तद्देहाला अतिशय प्रयासें हुडकिलें॥

सख्याला भेटावें म्हणुनि वनिता तद्गृहिं शिरे
सुखस्वप्नीं तीचें हृदय रमलें, रोदन सरे।
नसे ठावें तीतें, प्रियकर विवाहांत खिळला,
सुधा वाणीमध्यें परि विषरसें पूर्ण भरला॥

तया पाहोनीयां आणि विसरुनी देह-जडता
प्रिया आलिंगाया पवनगति धांवे प्रहासिता।
वदे प्रेमोद्रेकें भरभर असे शब्द किति ती
परी 'स्वप्नीं वार्ता' गणुनि बसला निश्चलमती

पतीची ही वृत्ती बघुनि दयिता तीस वदली
'कुभांडे, कां येशी उगिच अमुच्या प्रेम-निलयीं?'।
बघे आर्ता त्यातें, जशि पतिस पांचालदुहिता,
जणूं ज्वालागारीं हरिणि गवसे भीति-चकिता॥

तदा त्याची पत्नी परुषवचनें ताडि तिजला
तथापीही तीचा प्रियकर न शब्दास वदला।
तिच्या आयुष्याचा अति विमल तारा निखळला
दिशा झाल्या आतां तिजसि पुढती धुंद सकला॥

मनाला रोधोनी प्रियकरसुखार्थी व्रत वरी।
निघे शोकावेगें; परसुखरताही किति तरी!।
'नको माझ्यायोगें किमपिहि तिला दुःख घडणें,
अशा हेतूसाठीं त्यजि गृह सतो दुःखित मनें॥

तशी चाले बाला विगलिततनू साश्रुनयनीं
दिसे ना पंथाही, सळसळति दुःखोर्मिच मनीं।
समुद्राच्या कांठीं तरि घडि विरामा मिळविण्या—
निघे या आशेनें;—अहह! विधिला येत न दया!॥

शिलाखंडीं बैसे अभिमुख समुद्रा दृढमती
तिथें सूर्याचेही किरण तपवीती तिज अती।
तसा वायूही तद्वदनिं कचभारा पिसकरी
निसर्गाच्या आतां जणुं गवसलें 'क्रीडन' करीं॥

उफाळे सिंधूही तिजपुढति, जी खिन्न बसली
धुमाळी पाण्याची गगनगतमेघांस भिडली।
तुफानीं लाटांनीं रंवरंवत कांठा धडकला
तिच्या चित्तक्षोभा अनुसरित सिंधू उधळला॥

न चित्ताला लाधे तिजसि सुख, तेथेंहि न सुचे
—हृदीं शंकू जातां जगति मिळणें सौख्य कुठचें?।
मनोरे बांधीले अजवरि मनीं तेहि पडले
तिच्या आयुष्याचें पुढिल सगळें कार्य फसलें!॥

सती बोले, “ आम्हीं किति तरी इथें क्रीडत असूं
किती औत्सुक्यानें पुढिल महदाशा रचितसूं ! ।
सख्या, तें सारेंही पुढिल ठरलें फोल जगतीं
मदीयाशेच्या ह्या धडधड चिता येथ जळती ! ! ॥

स्मरे, एके वेळीं घसरुनि जलीं येथ पडलें
प्रिया, तुम्हीं तेव्हां झडकरि मला घट्ट धरिलें ।
स्मरे, मातें तेव्हां वदन तुमचें तोषवि मना
असें बाहू-पाशीं पुलकित तनू आर्द्र-वसना ! ॥

‘ तुला आम्हीं तेथें पडत असतां हात दिधला
तयाचें तें राहे परत मिळणें ! ’ बोल वदला ।
तसें बोलोनी हो मजजवळुनी जें मिळविलें
—अहा ! त्या सौख्याची पुनरपि स्पृहा फोल करणें ! ॥

तुम्हां जेव्हां झाली जखम निटिलीं खोल किति ती
तदा मद्गेहीं मी निशिदिनिंहि सेवा करिं किती ! ।
तयाची सांगा हो सकल अजिं कां विस्मृति पडे !
—जरी वागा ऐसें तरिहि दिधलें चित्त न उडे ! ॥

स्मरे, एके काळीं मम सदनिं तुम्हांस वदलें
‘ सख्या, जातें स्नाना, मुळिं हलुं नका ’ तें विनविलें ।
असें सांगोनी मी, समजुनि तुम्हां ‘ सज्जन ’ मनीं,
शिरें विश्वासानें प्रहसित मनें स्नान-सदनीं ॥

‘ कुणी तेथें ये ’ ही नुरलि मज भीती बघ यदा
तुषार-स्नाना मीं कितव, सुरु केलें मग तदा ।
परी एकाएकीं किति तरि हळूं चालत, असें
तुम्ही तेथें आलां;—अशि कपटजालीं पुरि फसें ! ॥

तदा होतीं माझीं किति तरी अशी दीनवसनें
मला होतां तुम्ही धरित हृदयीं हास्यवदनें ।
‘ निसर्गीं तूं चारू, तुजवरि सखे, कांहिंहि खुलें ’
मदीयें दुष्यन्तें मज किति असें तें खुलविलें ! ॥

अशा प्रेमाच्या मी किति अठवणी काढित बसूं ?
सख्या, पूर्वीं दोघें किति तरी विहारा करितसूं ।
मला दीनेला दे गतविभववार्ता सुख बहू
उरे त्याचें आतां ‘ स्मरण ’, वरि त्यां जीवित सहूं ! ॥

विवाहग्रंथीनें निगडित तुम्ही--स्वप्निं न शिवे,
मला भोळीला कां तुम्हि फसविलें ? काय बरवें ! ।
कसें झालें तेव्हां मजसि तुमची गोष्ट कळतां
--हृदीं वज्रापातासम अनुभवीं सत्य-कटुता ! ॥

तुम्हा कोण्या रीतीं मज सहज आले विसरतां
तसें कोठेंहि हो पुरुषहृदया येइ रमतां ।
परी आम्हांठायीं परमसुख प्रेमाविण नसे
पुढें जाणें जाणें, परत फिरणें ज्यांत न वसे ॥

कळोनीयां आलें मजसि तुमचें प्रेम न खरें
—तरी त्वत् ठायीं हें मन चिकटतें, प्रीति न सरे ! ।
स्वतांसाठीं प्रीती करित बसतें, लोभ न मनीं
स्वयें प्रीती-मुक्ती मिळविन सख्या, विश्व-विपिनीं ! ” ॥

असो ! इच्छीना मी तिळभरिहि सौख्या मिळविणें
असे जी भाग्याची उचित तिज सर्वस्व असणें ।
जगीं एकेकाच्या नशिबिं असतें सौख्य मिळणें
दुज्यानें तो हेवा किति तरि असे व्यर्थ करणें ! ॥

शुका ! मीं कोंडीलें निशिदिनिंहि हृत्पंजरिं तुला
तुला येईना तें तिथुन करतां भ्रष्ट मजला ।
न येई प्रेमाला फिरफिरुनि जागा बदलता
असो ! ऐशीं दुःखें कशिं तरी मला येतिं सहतां ! ॥

गमे पूर्वी मातें, जगतिं जगणें सौख्य किति तें
—चला जाऊं द्या तें; पुनरपि मनीं तें न अणितें ।
जयें दुर्भाग्यें ह्या जगतिं बघ प्रेमास वरिलें
तयाच्या जन्मा ये सतत जळणें खास असलें ! " ॥

—स. र. पंतसचिव

# ४१ ‘उद्धार’ या खंडकाव्यांतील प्रसंग

[ कथासूत्र—मानाजीराव नांवाचा एक अत्यन्त नीच मनुष्य स्त्रियांना फसवीत रहातो. अंगांत गुण (शूरपणा, दातृत्व, सहृदयत्व वगैरे) असतात; पण या एका दुर्गुणानें सर्व गुणांची माती होते. किंबहुना हे सर्व गुण त्याच्या ह्या दुर्गुणास पोषक होतात. त्याच्या स्वरूपाचें व घोड्याचें वर्णन; नंतर त्याचे दोनतीन पराक्रम (?) वर्णन केले आहेत. शेवटीं त्याची विमला नांवाच्या एका अत्यन्त निर्मल मनाच्या मुलीशीं गांठ पडते. तिचें त्याच्यावर आत्यन्तिक प्रेम जडतें. तो तें प्रेम झुगारूं शकत नाहीं, प्रेमांत गुरफटून जातो; पश्चात्ताप—पश्चात्ताप—पश्चात्तापांत तो होरपळूं लागतो. तिच्याकरितां तो वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास तयार होतो. त्याच्या पापाचा घडा आतां पूर्ण भरतो. केवळ विमलेच्या दिव्य प्रेमामुळें मानाजीरावाचा उद्धार होतो. त्याच वेळीं देशांत युद्ध सुरू होतें. तो तिच्याकरतां (तिच्या सांगण्यावरून) युद्धावर जातो त्याच्या अंगांतील गुणांचें आतां चीज होतें. जबर जखम होऊन तो रणांगणावर पडतो. विमला लढाईंत जखमी झालेल्यांची शुश्रूषा करीत करीत त्याच्याजवळ येते—ओळखते—पाणी पाजते—तो मरतो! दुसऱ्या जखमी शिपायानें पाण्याकरितां हांक मारल्यावरून ती पुढें जाते.]

## १ मानाजीरावाचें वर्णन



अरबी घोडा, रूबाब मोठा,
दौडत जाई चौफेर।
धन्यास घेउन, करीत फुरफुर,
पुच्छ उभारित, अश्ववर॥

जवान सुंदर युवक शोभला
घोड्यावरती सरदार।
नोंक झोंक तरि पाहुनि घ्यावा,
छाती दिसते भरदार॥

घोडा फेंकी, धूळीचा तो—
लोट चालला अस्मानीं।
कटिशीं शोभे खड्गलता जी,
रक्षण करिते पदोपदीं॥

डोइस बांधी फेटा, शामला
सोडियला निज पाठीला।
चमक दृष्टिची जहर भासली
हृदयान्तरि पर-नारींला॥

गोड बोलुनी साखर पेरी—
स्रवते मधु तन्मुखांतुनी।
दृष्टी मोहक हृदय भेदिते
स्नेहा वरिते जरि वरुनी॥

अनेक नारी भुलवी, गहिरी
नजरेच्या खर बाणांनीं ।
खोड लागली भलती याला—
फसती नारी शब्दांनीं ॥

शूरत्वाची, दातृत्वाची
मूर्ति खरोखर हा राणा ।
स्त्रियां भुलविणें नाद् लागला—
नव्हे जाहला हा बाणा ॥

सरशीवरती सरशी मिळतां
खोड वाढली त्या न मिती ।
स्त्री-शीलांना करीत भक्षण
राक्षस चाले या रीती ॥

* * *

## २ पाटिलांची सून



रानामधुनी फिरकत असतां
घोड्यावरूनी हा राणा।
ओढ्याजवळुनि जाई तेथें,
दिसली त्यासी मृगनयना॥

पिवळी कान्ती, यौवन अंगीं,
घडा भरूनी ठेवियला।
सोबतीण तिज उचलूं लागे—
दिसे फांकड्या रावाला॥

मन तिजवरती गेलें ह्याचें,
पृच्छा यानें चालविली।
पाटील हिचा श्वशूर कळलें
परी न मागें मति फिरली॥

घडा घेउनी दूरदूर ती
गेलेली ह्या जें दिसली।
त्याच दिशेनें घोडा फेंकी—
यापरि याची मति सजली॥

जातां जातां दोन्ही झाडां—
मधुनी दृष्टिस ती पडली।
घडा डोइला, हात घड्याला,
चाले झपझप वेल्हाळी॥

सांज जाहली, पिवळीं किरणें
वृक्षांच्या तीं शेंड्याला।
क्षणभर दिसलीं, शक्ति भासली
मरणोन्मुख जणुं रोग्याला॥

लहानशी ती राई होती
मार्गावरती तिजपुढती।
त्यांत बिचारी शिरे—नव्हे ती
शिरे नाव जणुं आवर्तीं॥

त्वरित गतीनें तिज हा तेथें
गांठी, पसरी निजजाल।
"सांजकालिं या वनांत शिरतां—
धोका खचितचि होईल॥

चिन्ता तुमच्या विषयीं वाटे,
जाउं नये हो या समयीं।
त्यांतुनि अपुली अबला जाती,
फिरे असे ही किति राई"॥

"नाहिं तसें हो कांहीं, आम्ही
जातों मार्गें ह्या नित्य।
वाट आमुची पायाखालिल,
भीती न तिळभरि मनिं, सत्य"॥

ऐसे बोलुनि चालूं लागे,
राव खजिल ते मनिं झाले।
'पुन्हां एकदां' म्हणून पुढती
जाऊनि तिजला विचारिलें॥

" घोड्यावरि तरि बसुनि एवढें
राईमधुनी जा बाई।
चला, येवढी मान्य करा मम
विनती तुमच्या ही पायीं ! ॥

पाटिला घरीं घडा धाडुनी
कोणां करवी मी देतों।
घोड्यावरती चढाच, मी
हा सोबत राईंतुनि येतों " ॥

बोलुनि ऐसें, उतरे लगबग,
तर्हि विस्मित तें झाली।
मूकस्थिति ही तिची पाहुनी
संधि तयाला सांपडली ॥

इतुक्यामध्यें पोर कुणी तरि
दिसला तन्मार्गें जात।
तिच्या डोइचा ठेविं तच्छिरीं
मर्द आमुचा घडा तिथं ॥

मोल श्रमाचे देउनि त्यातें
ठिकाण सांगे—तो गेला।
गोष्ट घडे ही क्षणांत न कळे
कैशी घडली युवतीला ॥

भोळी बाला भांबावोनी
तरुणसंनिधीं गेली ती।
समय सांजचा, जवळि न दुसरें !
मनीं बावरें ती युवती ॥

करास धरुनी तिच्या म्हणे हा,
“ अश्वावरतीं चढा क्षणीं ” ।
गती न दिसली दुसरी तिजला,
चढली अश्वीं दिनवाणी ॥

चढतां युवकस्पर्शानें ती
लज्जित होई अनिवार ।
शब्द न बोलूं शकली तेव्हां
दृष्टिहि वळवी ती नार ॥

युवक बोलला, “ परिचय तुमचा
प्रथम असे हा आम्हातें ।
बोलावें न कळे कैसें तें,
परि उत्कंठा नावरते ॥

कुठें राहतां ? कुलीन दिसतां !
कष्ट न खुपती पुष्पाला—” ।
प्रीती-मांत्रिक यापरि लागे
पसरूं अपुल्या जालाला ॥

अश्वावरती टाकियला कर--
तद्अंगिं जाई लगटून ।
तिला कसेसें होई तेव्हां
जालीं गवसे जणुं मीन ॥

म्हणे “ रावजी, त्रास घेतला
मजकरितां हो तुम्ही किती ” ।
वरकरणीं ती बोले ऐसें
तया वाटलें ‘ प्रेम ’ अती ॥

राई सरता उतरे तरुणी
लगबग वळुनी मग पाही।
मृगनयना तयिं म्हणे तयाला!
"अतिशय तुमची उतराई"॥

म्हणे युवक तो, "भेटायातें
येइन तुमच्या जैं द्वारीं।
ओळख ठेवा, प्रेमहि ठेवा!"
मुजरा करुनी जाय दुरी॥

घोड्यावरती स्वार होउनी
निघेच सास्मित होवोनी।
तीहि तयाला निरखुनि पाहत
मंदगति शिरे निजसदनीं॥

—श्री. र. पंतसचिव

# ४२ कल्पना-सृष्टी

—+++*+++—

धूमगूढ भावना,
व्यापिती मनोऽगणा
प्रदीप्तचित्त-अन्तरीं
मूर्ति रचित भास्वेरा ॥

प्रफुल्ल स्वर्गिंचीं सुमें
स्यूत कल्पना-गुणीं,
मालिकेंत गुंफिलीं
काव्य-सृष्टि निर्मिली ॥

प्रबल हृदयकंपनें
स्फूर्तिरूप ईश्वरें
व्यक्तरूप इच्छिलें
शब्दचित्र रेखिलें ॥

खळबळ जी अंबुधिची
नील नभःपटावरी
सुधाकरास भेटते
तेंच काव्य शोभतें ॥

जलान्तरित भावना
पाणबुड्या होइ कवी
पाहिल्या कदा कुणी ?
हृदय-सृष्टि देखुनी ॥

प्रीति-झरा हृदयाचा
हृदय-तीर भिजवितसे
खळखळाट वाहतो
तेथ कवी निपजतो ॥

प्रीति-जादुगार हा
प्रथम गोड भासतो,
बाल्य संपवी क्षणी,
शल्य खोंचतो मनीं ॥

ध्मात हृदय-कंपना,
टाकिती थरारुनी
विवर्ण वदन-वीचिका
कल्पनेंत कल्पका ॥

—स. र. पंतसचिव

## ४३ रवीन्द्रनाथास

—+++:*:+++—

दृष्टीला पडली तुझी आजि मला मूर्ती रवीन्द्रा ! इथें* ।
झालें सार्थक पूर्ण काव्य—जनुचें देखोनि भव्याकृते ! ! ॥

भेटावें तुजला अशी किति तरी आशा मनीं पोशिली ।
आतां ही जमवून भेट विधिनें येथें अशी आणिली ॥

तूझें सत्य विशाल भाल मजला स्वर्गीय वाटे स्थली ।
वाटे केशकलाप शुभ्र बघुनी गंगाच्च कीं पातली ॥

तूझ्या अंतरिंची दयार्द्रसरिता नेत्रांमधूनी दिसे ।
त्वद्दास्यध्वनि विश्वप्रेम सुचवी जें अंतरंगीं वसे ॥

काव्याची तव थोरवी वद कशी येई मला वर्णितां ? ।
काव्याचें तुझिया रहस्य कळण्या नाहीं मला पात्रता ॥

शब्दांनीं कवनांत आजवरतीं चित्रें तुवां काढिलीं ।
रेघांनीं परि आज काढिशि—कला काव्यास ही जोडिली ! ॥

'अल्पा देवुनियां बहू मिळविणें' ही युक्ति मीं योजिली ।
अर्पोनी 'त्रिदला' तुझ्याजवळुनी 'गीताञ्जली' आणिली ! ॥

—स. र. पंतसचिव

* लंडन मुक्कामीं, १०-७-३० रोजीं.

## ४४ ज्ञान

[ Where ignorance is bliss it is folly to be wise ]

मज दिलें कशाला व्यर्थ ईश्वरा ! ज्ञान ।
मम सौख्यामध्यें पडली त्यानें वाण ॥

मी जेव्हां होतें बालपणीं अज्ञान ।
मज वाटे जग हें सर्व सुखाची खाण ॥

किति खावें, प्यावें, खेळावें, हिंडावें ।
जो खाया देई त्यावरि प्रेम करावें ॥

मैत्रिणी जोडिच्या घेउनि गुज बोलावें ।
कावळ्या-चिमणिच्या गोष्टींतहि रत व्हावें ॥

मोडकेतोडके तुकडे बहु जमवावे ।
बंगला बांधतां—परब्रह्म वाटावें ॥

घरिं येतां प्रेमें आईला बिलगावें ।
खेळतां खेळतां दमुनी झोंपुनि जावें ॥

खोट्यानें भरलें जग हें नव्हतें ठावें ।
किति खुल्या दिलानें सर्वांशीं वागावें ॥

कधिं दुःख भासलें नाहीं खचित मनाला ।
जगताचा कधिंही व्याप मना नच गमला ॥

परि शिरतां हृदयीं ज्ञानरूपि हें भूत।
तैं विरजण पडलें सगळया आनंदांत॥

प्रभु! नको दुजें मज कांहीं तव वरदान।
दे शान्ती किंवा गाढ गाढ अज्ञान!॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव.

# ४५ सात रंग

—+++*+++—

चित्रकार–कुशलता होइ कुठें पूर्णता ?
जेथ उषा–कमल खुलें, जेथ सांज–देवि डुले ॥

शिल्पशास्त्र पूर्ण कुठें ? मूर्ति–चमत्कार कुठ ?
विविध मेघ–संहती नभांत मूर्ति निर्मिती ॥

सामगान–देवता गाति त्या कुठें स्वतां ?
वनांत वृक्ष–संकुलीं विहंग–वृन्द–मेळनीं ॥

नर्तनांत निपुणता येइ कुठें पाहतां ?
नीलमेघ देखुनी मयूरसंघ–नर्तनीं ॥

क्षणविनाशि भंगुरता सांग कुठं कोमलता ?
बोलिवरि बागडता कुसुम वरित म्लानता ॥

मनास शान्तिदायिनी प्रभा कुठें प्रमोदिनी ? ॥
प्रसादरम्य सारसीं स्फूर्तिपूर्ण मानसीं ॥

जगांत अमृतवर्षिणी प्रीति कुठें राहते ?
एक चक्रवाक—कुलीं कुठें न अन्य राहिली !

—स. र. पंतसचिव

## ४६ 'योगीन्द्र' या खंडकाव्यांतील प्रसंग

[ कथासूत्र—हिमालयाच्या एका अत्यंत शान्त प्रदेशांत एक योगीन्द्र रहातात. ते जणुं काय 'ईश्वर'च आहेत.

हिमालयाची योग्यता, हिमाचे ढीग, हिमनद्या, झुलते पूल, मानससरोवरावरील हंसांचें दर्शन, योगीन्द्र रहातात तो शान्त प्रदेश, योगीन्द्रांची गुहा, सभोंवारचें वातावरण वगैरेंचीं वर्णनें. योगीन्द्र पदप्रक्षालन करून स्वस्थानीं जावयास निघतात; इतक्यांत शुभ्र वस्त्र परिधान केलेली, केंस विसकटलेली, धाय धाय रडत अशी एक स्त्री येते; ती जणुं काय 'पृथ्वी'च आहे. योगीन्द्रांच्या पायांवर ती मस्तक ठेविते व आपलीं गाऱ्हाणीं सांगते.

( मानवांचीं दुःखें, वियोग, खऱ्या प्रेमास किंमत नाहीं, खोटेपणा, अन्याय, जुलूम, लढाया, गुलामगिरी इत्यादि गाऱ्हाणीं. )

पृथ्वीचीं गाऱ्हाणीं ऐकून ईश्वराचें अन्तःकरण द्रवतें व तो तिचें शान्तवन करतो, 'कृष्ण, बुद्ध, येशू, शिवाजी वगैरेंसारखा मी पुन्हां अवतार घेऊन तुझीं दुःखें निवारीन. तोंपर्यंत तूं धीरानें जाचांत दिवस काढ.' वगैरे वगैरे.]

# १ प्रशान्त प्रदेश

+++*+++

नगेश्वराच्या हिमालयाच्या निवान्त भागांत
शान्ती पसरे, ईशनिर्मिता जादू संचरत ॥

पसरे शान्ती, शान्ति नव्हे ती, सच्चिन्मयमूर्ती, ।
करि हिमकन्या-हास्य तयांतिल अवकाशा पूर्ती ॥

शान्त शान्त चहुंकडे दिसतसे चलित स्थिर भासे ।
शान्ति-देवता येत घराला प्रेमें वाटतसे ॥

पंचमहाभूतेंही येथें वरिती शान्तीला ।
वायू येथिल हले, न हलवी एकहि पर्णाला ॥

वृत्त स्थिर जणुं समाधिमाजीं रत हे योगीन्द्र ।
निरभ्रगगनिंहि वाटे राहे काय स्थिर चन्द्र ! ॥

शुभ्र शुभ्र चहुंकडे भासतें—हिममय भूमि दिसे ।
यश हें पसरे नगराजाचें सर्वदिशीं खासें ॥

तुटाति कडे हे एका बाजुस, हिमधारा स्रवती
स्रवतां स्रवतां कुंठित गति त्या तेथेंच स्थिरती ।

स्थिर हिमधारा गमती मौक्तिक तोरण बांधियलें ।
माहेरीं ही शान्तिदेवता येई म्हणुनि भलें ॥

नगराजींवरि मेघांची ही माला स्थिर झाली ।
शान्त जलाशयिं बिंबित होतां वाटे रेखियली ॥

दरीं-दरींतुनि वाहे निर्झर जालें या स्वच्छन्द ।
वरुनी वाटे शशि-प्रकाशीं स्थिर चमके वीज ॥

तत्स्रोतावरि तुटला होता एक कडा सरळ ।
विवर त्यावरी, भरलें होतें जेथ तमो-गरळ ॥

गुहा असे का तपोधनाची?—खोल खोल आंत ।
जल-प्रपात-ध्वनी उमटतो द्विगुणित विवरांत ॥

प्रवेश करितां, पाणी झिरपे, दृषदांवरि पडतें ।
दिसतें नयनां, श्रवणीं पडतो धब् धब् ध्वनि तेथें ॥

बाहेरूनी मधुनी मधुनी प्रकाश डोकावी ।
मौक्तिकधारा स्वान्तर्गत निज तेजाला दावी ॥

फेंसाळे जल पाषाणांतुनि, पुढती फेंस सरे ।
कुंडांमध्यें थेंब ठिबकतीं, पसरति जाळीं चक्रें ॥

खोल खोल त्या गव्हरांतुनी गभीर रव येई ।
गुहेंत सगळ्या भरोनि जातां प्रसन्न मन होई ॥

शान्त, हृद्य तों ध्वनि ये कर्णीं, पवित्रता भासे ।
'हरिः ॐ' शब्दां श्रवुनि पूतमन भरलें शान्त-रसें ॥

*　　　*　　　*

# २ योगीन्द्राचें वर्णन



गुहेंत शिरतां मूर्ती दिसली योगाभ्यासाची ।
सतेज आत्मानन्द-निमग्ना ती योगीन्द्राची ॥

समाधिमग्ना योगीन्द्राची वृत्ती जरि व्हावी ।
हास्य खेळतें तरी मुखावरि जगत्प्रेम सुचवी ॥

सप्तास्थितितुनि जातां जातां गेले हे वरती ।
तरी तयांची अखिलाभूतीं अटली ना प्रीती ॥

परम स्थानीं विराम पावति सकला आकांक्षा ।
चिद्-वैभव-शिखराची येथें पूर्ण होइ कक्षा ॥

सुखदुःखाचें क्षितिज मिळालें प्रशान्त कुहरांत ।
जेंवि वेगळे रंग न दिसती मिश्रित सुरधनुंत ॥

पुरुषप्रकृती एके ठायीं करिती वासाला ।
द्वंद्वें सगळीं विरोध सोडुनि वरिती एकीला ॥

अणु-परमाणू ब्रह्मानंदें लपेटुनी जाती ।
ॐकारानें वायूकणही संनादित होती ॥

गुहेंत शिरतां आपपर असे भाव जाति विलया ।
सर्वांभूतीं ब्रह्मप्रतीती येइ प्रत्यया या ॥

समाधींतुनी हलके हलके उतरति योगीन्द्र ।
ओष्ठामधुनी अस्पष्ट-ध्वनि येई स्वर मन्द्र ॥

नेत्र उघडले तेजस्वी जणुं ताराद्वय दिसले ।
अंधकार नभपट या परिनें उद्भासित झालें ॥

योगी उठले, कमंडलू तो करांत घेवोनी ।
जल-प्रतापा-सान्निध गेले थोडें चालूनी ॥

ब्रह्मतेज प्रत्यक्ष जलाशयसमीप जावोनी--।
पूत स्वतांला करी—चमत्कृति आहे सुरभुवनीं !॥

मन्द्र गभीर ध्वनि वदनांतुनि चाले सतत पहा !।
विस्मय वाटे, ईश्वर शिणवी कां अपुल्या देहा ?॥

ईश्वरलीला अगम्य अतुला कळे न नरमतिला ।
शास्त्रज्ञांची बडबड शिणली; फोल वाद ठरला ! ॥

पदप्रक्षालन करुनि परतती मुनि अपुल्या स्थाना ।
इतुक्यामध्यें धांवत आक्रंदत येई ललना ॥

श्वेतवस्त्र परिधान करितसे—केशभार सुटला ।
अश्रू-माला ओघळतांना वदन-प्रान्त मळला ॥

श्वेतमूर्ति ही धांवत आली योगीन्द्रापाशीं ।
—पुराणपुरुषा भेटे शाश्वत कीर्तीची राशी ॥

अंग टाकलें धरणीवरती, पद-वंदन केलें ।
चमकत कचपाशानें मुनिच्या पदांस झांकियलें ॥

मुक्तकंठ ती रडूं लागली, पदांस सोडीना ।
योगीन्द्राच्या अश्रू आले एकदोन नयनां ॥

धीरप्रवृत्ती झांकुनि टाकी तरल मना अपुल्या ।
अन्तर्मुख होवोनि भावना कठिण तयें केल्या ॥

" मुलीं काय हें, वेडी असशी ! धीर धरीं बाळे !। "
केशकलापांवरुनी निजकर फिरवित मुनि बोले ॥

हात नव्हे ही परमेशाची माया गोंजारी।
सुधारसानें थबथबलेला कर दुःखा वारी ॥

अश्रुजलानें भरलेलें मुख-मंडल वर केलें।
योगीन्द्राच्या नयनापांगीं अश्रु तिला दिसले ॥

दुःखित साध्वी, कारुण्याची मूर्ति महाश्वेता।
पृथ्वी स्त्रीरूपाला वरुनी येई येथ स्वतां ! ॥

—स. र. पंतसचिव

## ४७ ईशस्मरण



( वृत्त–पृथ्वी )

नता करित मी तुझें स्मरण नित्य भोरेश्वरा !
नकोस विसरूं प्रभो तव अजाण या लेंकरा।

जरी चुकतसें पदोपदिं परी क्षमा तूं करीं
अजाण तव बालकावरि कृपा–सुछाया धरीं ॥

'दयाब्द' म्हणती तुला म्हणुनि मी आजि प्रार्थितें
दया प्रकटुनी करीं सतत सार्थ त्वन्नाम तें।

दया–सलिल ओपुनी मम जिवास वांचीव या
तयाविण निघे शरीरगत जीवहि जावया ॥

जरी ढकलुनी दिलें मजासिं तूं, तरी मी सदा—
करीन तव याचना, न विसरीन तूझ्या पदा।

अनाथ--परिपालनव्रत तुवांहि स्वीकारिलें
कृपेस प्रणता अशी वद न का तुझ्या जाहलें ? ॥

जयें विमल भक्ति ती वरिलि त्या जनां तारिसी
मलाच करुणेश्वरा, जगतिं कां भ्रमीं पाडिसी ?।

गमे तुजासि कां तुझ्यावरिल भक्ति ना शुद्ध ती
'विशुद्ध मम भक्ति' हें तुजसि कोवि सांगूं किती ? ॥

मनांत अविशुद्धता, वसत अंगिं ना पात्रता
सुखांत बहु सक्तता, गुरु-जनीं नसे मान्यता।

तुझ्याविण अशा मला जगतिं कोण रे वारणीं ?
अशी गवसलें अभिष्ट बनुनी जगाच्या रणीं ॥

स्वरूप तव वर्णण्यास्तव प्रयत्न केलें महा
परी न यश त्यांतची लवहि येइ इच्छा, पहा ।

जिथें कविगिरा थकोनि मतिमंद होतो विधी
तशांतुनि असे बहूत जगदिश, मी अल्पधी ॥

असो मम मुखीं तुझें सतत नाम तारावया
घडो न तव विस्मृती जरिहि काल ये न्यावया ।

तव स्मरण या जगीं किति जणांस तें उद्धरीं
कितीक तरुनी भवाब्धितुनि मुक्ततेसीं वरीं ॥

अशापरि सदा जगन्नियमका, तुला प्रार्थितें
अम्हांवरि जगीं कृपाफल सदैव तूं दावि तें ।

सदैव बल दे मला जगतिं व्याप हांकावया
' सरोजिनि ' वरी करीं प्रणतवत्सला, ती दया ! ॥

—सौ. सरोजिनीबाई पंतसचिव

## ४८ अभंग-माला



१

मात्रा, यमकांनीं जखडीलें देवा।
रूप तुझें गाया येत नाहीं ॥

गण-शत्रुगण ओघांत येउनी।
मजसि रोधोनी ठेवीताती ॥

काव्य-शक्ति माझी मरणा टेंकली।
मुळीं न शकली गुण गाया ॥

' मात्रा ' देउनीयां कसा तरि हिचा।
प्राण लांबवीला येवढेंच ॥

यमक-यमाचा काव्या लागे फांस।
प्रेतांची कीं रास रचीयली ॥

तुझ्या गुण-गाना ' तुकयाची वाणी '।
म्हणुनी मी आणीं, यश देई ॥

२

कवित्वाची स्फूर्ती अंतरीं स्फुरते।
—उषा प्रकाशते पूर्वभागीं ॥

स्फूर्तीचे रंग उषेच्या समान।
होती भासमान अंतरंगीं ॥

उषःच्छटा तेथें खुलती अपाप।
कविवर झेप तेथें घेती॥

उषःप्रकाशाला नाहीं आज्ञापिलें।
तेज-पुष्प खुलें स्वयंसिद्ध॥

संगीत-नादाला तेव्हां ये भरती।
लाटांच्या संगतीं चित्त रंगे॥

उषा, स्फूर्ति दोन्ही समान वाटती।
तयांचीं हीं नातीं बहिणींचीं॥

३

संसार-जंजाळीं जीव अडकला।
गुंतत राहिला सारखा हा॥

धागे वाढताती नित्य रोज नवे।
मायेचे हे दुवे दृढावती॥

मृत्यू रोज दावी संसार घडीचा।
निर्धार मनाचा तरी नाहीं॥

क्षणभरि वाटे संसार नकोसा।
परि वीट असा येत नाहीं॥

भजन पूजन देवा, होत नाहीं।
गुंततच राहीं चित्त येथें॥

मित्रपरिवारीं, गणगोतदारीं।
स्मरणाहि दूरी होई तुझें॥

४

तुझ्या गुणार्णवीं क्षुद्र जलचर ।
अजाण पामर आहे देवा ॥

गुणानुवादाला कविश्रेष्ठ गाती ।
त्यांच्याशीं मी नातीं, कैशीं जोडूं ? ॥

द्विज-वृन्द सूक्तें उषःप्रकाशांत ।
पुण्यधान गात राहताती ॥

रेतीचा समुद्र दूर पसरला ।
शेवटीं दिसला नभःपट ॥

नभःपटासम देवा तुम्ही दूर ।
रेतीचा मी पूर कैसा तरूं ? ॥

तुम्हींच प्रसाद करा आतां देवा ।
वाजवून घ्यावा गुण-पावा ॥

५

संतरूपें देवा जगीं उतरशी ।
दुःखास वारसी जनतेच्या ॥

दुःखांचीं हीं ओझीं डोईजड झालीं ।
शरीरें वांकलीं त्यांच्याखालीं ॥

ओझीं उतरोनी सोडीव आम्हांला ।
शांतता मनाला देईं तूंच ॥

४

ही ज्ञानाची मायाजाळीं
धडपड व्यर्थ जहाली।
श्रुति स्मृति कंटाळली
—परमेशा दया आली !॥

५

जीवन्मांगल्या भुकेला
ज्ञानवृक्ष हेलावला।
—भक्ति-तारा प्रकटला !
वृक्ष-कम्प विरामला॥

६

ज्ञानविटपा शान्ति आली
शुद्धि-बुद्धि सर्व गेली।
तेजस्विनी तारा दिसली
ज्ञान-पिपासा संपली !॥

—स. र. पंतसचिव

# एकावन्नावी



काव्योद्यानिं कधीं कधीं विहरतां काहीं सुमें तोडिलीं
तूंही जीं खुडिलीं सखे, मिसळुनि माला अशी गुंफिली ।
नामें ' निर्झरिणी ' अशी रघुवरा पायांवरी वाहुनी
तूंतें ह्याच प्रसाद आर्पित असें; हा यत्न त्वद्रंजनीं ! ॥

नाहीं काव्यपटुत्व अंगिं, तितुकी दैवीकृपाही नसे
झाले जे कविराज तद्यश मला गायाहि ना येतसे
वाग्देवी जणुं माणिकें उधळिते या सत्कवींच्यावरी
मातें मात्र तदीय ती लखलखी दृष्टीस ये भास्करी ॥

कांहीं सृष्टिमधील लोक-विकृती येथें सखे, गुंफिल्या
प्रेमाच्याहि तशाच अल्पमतिनें त्या भावना वर्णिल्या ।
काव्यानंदिं तरंगता कितिकिती मद्वृत्ति संतोषली
वाटे काव्यकला स्वतां गुणगुण्या ईशें जगीं धाडिलीं ! ॥

संसारीं विमनस्क होशि जइं तूं मालेस घ्यावें करीं
हा नेईल रघु-प्रसाद मनिच्या सर्वांहि चिंता दुरी ! ॥

—स. र. पंतसचिव

# परिशिष्ट



## स्वर-ताल-लेखनपद्धति

### ( संक्षेपानें )

[ या परिशिष्टांत कांहीं पद्यांचें स्वर-ताल-लेखन दिलेलें आहे. तें पद्याची चाल ( हार्मोनियमवर वाजवून पाहिली असतां ) बरोबर ध्यानांत यावी इतक्याच बेताचें दिलें आहे. हीं पद्यें चाल लक्षांत घेऊन, तान मुरकी घेऊन, इच्छेनुरूप गावीं. ]

नि. ध. प. इ० स्वराखालीं बाजूला टिंब = मंद्रांतले (खर्जांतले) स्वर.

सां रिं गं इ० स्वरावर रेघ = तारस्वर ( टिपेचे स्वर ).

सा रि ग इ० मध्य सप्तकाचे स्वर ( साधीं स्वराक्षरें ).

रि॒ ग॒ इ० कोमल स्वर, ( स्वरावर ˘ चिन्ह ).

मं = तीव्र स्वर, ( स्वरावर ^ चिन्ह ).

× = सम, जोराची टाळी—आघात.

+ किंवा — = ताली, साधी टाळी—आघात.

० = काल, ( खालीं ) हात बाहेर फेकणें.

सा० / साऽ } --एक मात्रा तो स्वर किंवा गीताक्षर लांबविणें.

नि / ध } डोक्यावरचा स्वर घटकन् घ्यावयाचा.

गमप—एका मात्रेंत तितके स्वर ( जलद ).

| | १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | मात्रा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ताल धुमाळी | × | | × | | ० | | | | ,, ८ |
| ,, केरवा | × | | | | ० | | | | ,, ८ |
| ,, दादरा | × | | | ० | | | | | ,, ६ |

,,त्रिताल १ २ ३ ४ ५ ६ ७ ८ ९ १० ११ १२ १३ १४ १५ १६

× × ० – मात्रा १६

ताल-चिन्हें आरंभीं देऊन त्याखालीं मात्रांच्या वांटणीनें गीत-स्वर आणि त्याखालीं शब्दाक्षर दिलें आहे.



# गीत ४ थें—हृदयार्पण

**गौडसारंग**, ताल–एका

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| × | ० | + | ० | + | + |
| रि सा | रि नि. | सा सा | ग ग | रि म | ग ग |
| म द | न व | द न | म न | सु ख | वि त |
| मं प | ग म | ग म | रि ग | रि म | ग म |
| मा ऽ | ध व | हा ऽ | ये ऽ | ई ऽ | ऽ ऽ |
| ग म | ग प | प प | नि ध | नि ध | प प |
| पैं ऽ | ज ण | र व | क रि | छु म | छु म |
| मं प | मं ध | मं प | ग म | रि म | ग म |
| चि ऽ | त्त वे | ऽ ध | हो ऽ | ई ऽ | ऽ ऽ |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| प प | प नि | ध नि | सां सां | सां सां | सां सां |
| च र | ण क | ण त | ठु म | क ठु | म क |
| ध नि | ध नि | सां रिं | सां नि | ध प | ० ० |
| हं स | त ये | ऽ त | पा ऽ | ऽ ही | ऽ ऽ |
| ग म | ग प | प प | नि ध | नि ध | प प |
| प द | रु ण | झु ण | अ व | ण सु | भ ग |
| मं प | मं ध | मं प | ग म | रि म | ग म |
| स त | त क | ऽ गिं | ये ऽ | ई ऽ | ऽ ऽ |

यापुढील प्रत्येक २ चरण 'चरण कणित' आणि 'पद रुण झुण' या दोन चरणांच्या चालीनें म्हणावे. व शेवटीं 'मदनवदन' हा चरण जोडून म्हणावा.

## गीत ७ वें—हांक

( चाल—जा के मथुरा या कान्हाने ) केरवा

| × | ० | × | ० |
|---|---|---|---|
| ग ० म ० | ग रि ग ० | नि.सा रि ग | सा ० नी. ० |
| ये ऽ ई ऽ | कृ ऽ ष्णा ऽ | घां ऽ व त | ये ऽ ई |
| नि.सा रि ग | सा रि ग म | ग ० ० ० | ० ० ० ० |
| ल व ला ऽ | ह्रीं ऽ यं ऽ | ई ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ऽ |
| सा ० सा सा | ग ० ग म | प ० प प | ० प प ० |
| वा ऽ ट ब | घो ऽ नीं ऽ | ने ऽ त्र शी | ऽ ण ले ऽ |
| ग प प ० | प ० प ध | म प ग म | ग ० ० ० |
| क रु णा ऽ | कै ऽ शी ऽ | ना ऽ ऽ ऽ | ह्रीं ऽ ऽ ऽ |

पुढील प्रत्येक चरण 'वाट बघोनी' या चरणाप्रमाणें.

---

## गीत ८ वें—मत्स्यगंधा

( चाल—वसंतीं बघुनि मेनकेला० ) धुमाळी

| ० | × | ० | × |
|---|---|---|---|
| सा ० नी ० | सा ० ग ग | ग म प ध॑ | प ० ० ० |
| वा ऽ ले ऽ | मू ऽ क कें | ऽ विं व स | शी ऽ ऽ ऽ |
| गमपऽ ० ० | ग प प ० | गपधनिधऽ प ० | ग ० रि॑ ग |
| ऽ ऽ ऽ ऽ | वि न ती ऽ | मा ऽ झी ऽ | मु ऽ ग्ध यौ |
| गम ध॑पमेप | ग ग म ० | ग ० रि॑ रि॑ | सा ० ० ० |
| ऽ व ना ऽ | प ट ली ऽ | ना ऽ तु ज | सी ऽ ऽ ऽ |

याच चालीनें पुढील प्रत्येक चरण.

## गीत १० वें—अहिल्या-शिळा

( झिंजोटी–केरवा )

×　　　　　　　०
सा ग ० ग | रिगमऽ ग रि
यु गा ऽ यु | गां ऽ त रिं
　　　　　　　×
　　　　　　　नी. ० सा रि | ध. निँ. ध. ०
　　　　　　　ति ऽ ष्ठ त | ब स लें ऽ

　　　　　　　रि प
प. ध. सा रि | ग म ०
मी ऽ र घु | रा ऽ या

सा ० ग म | प ० प प
उ ऽ द्ध रि | शी ऽ म ज
　　　　　　　ग ग म प | ग म ग ०
　　　　　　　क धिं दे ऽ | वा ऽ तूं
म ग रि सा | रिगमऽ ग ०
ला ऽ वु नि | पा ऽ या ऽ

———

## गीत १० वें—अहिल्या-शिळा

या गीताला दुसरी चाल. (जोगी–केरवा)

×　　　　०
म धॅ ० धॅ | प धॅ ग म
यु गा ऽ यु | गां ऽ त रिं

×　　　　०
सा रॅ सा रॅ | नि. रॅ सा ०
ति ऽ ष्ठ त | ब स ले ऽ

नि॑
सा रॅ म म | गम धॅ प ०
मी ऽ र घु | रा ऽ या ऽ

ग ० म म | प धॅ प प
उ ऽ द्ध रि | शी ऽ म ज

प· धॅ पधॅनी ऽ | धॅ ० प ०
क धिं दे ऽ | वा ऽ तूं ऽ

नि॑
म धॅ प धॅ | म प ग म
ला ऽ वु नि | पा ऽ या ऽ

———

## गीत ११ वें—धांवा

(चाल—नव हिंद राष्ट्र झेंड्या) (सारंग–केरवा)

```
        ×          ०
सा सा | रि रि म म | प नीँ प म
म  म  | प रि सु नि | यां ऽ धां ऽ
          ×        ०
        री ० ० नि. | सा सा रि सा
        वा ऽ ऽ य   | दु व रा ऽ

      री ० सा ० | ० ० सा सा
      धां ऽ वा ऽ | ऽ ऽ म म

री री म म | प ० प प | म ० प ० | नीँ प म री
क्ष ण भ रि | बा ऽ जु स | ठे ऽ वा ऽ | पां ऽ वा ऽ
भा ऽ न र | हि त मी ऽ | झा ऽ लें ऽ | दे ऽ वा ऽ

        री ० म ० | प नीँ प म | री ० ० नि.
        सां ऽ भा ऽ | ळी ऽ जो ऽ | वा ऽ ऽ य

      सा सा रि सा | री ० सा ० | ० ० सा सा
      दु व रा ऽ | धां ऽ वा ऽ | ऽ ऽ म म
```

———

## गीत १२ वें—त्यागमूर्ति !

( भैरवी–केरवा )

×                    ०

० सां ० सां | निॅ रीॅ सां ० | ० धॅ ० धॅ | प धॅ म ०
ऽ त्या ऽ ग | मू ऽ तीं ऽ | ऽ भू ऽ मि | व र ती ऽ

० गॅ प म | गॅ रिॅ सा ० | रिॅ गॅरिॅगॅऽ रिॅ | सा ० ० ०
ऽ नृ म णि | रू ऽ पें ऽ | ऽ पा ऽ त | ली ऽ ऽ ऽ

याच चालीनें पुढले सर्व चरण.

---

## गीत १३ वें—प्रतापगडच्या देवीपाशीं

( भैरवी–केरवा )

×          ०          ×          ०

धॅ ० धॅ धॅ | धॅ ० धॅ ० | प प ० प | ० म म प
दे ऽ वि भ | वा ऽ नी ऽ | तु झ्या ऽ द | ऽ र्शना ऽ

प नीॅ नीॅ धॅ | धॅ प प धॅ | म प म ० | गॅ प म ०
व ऽ र्षा ऽ | रं ऽ भीं ऽ | आ ऽ लों ऽ | च र णीं ऽ

रिॅ गॅ रिॅ सा | ० सा सा रिॅ | म ० ० ० | ० ० ० ०
भा ऽ व यु | ऽ क्त र म | लों ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ ऽ

याच चालीनें पुढील प्रत्येक कडवें.

## गीत १४ वें—राजसिंह

( चाल—वीर मराठे बसले मेळीं )

| × | ० | × | ० |
|---|---|---|---|
| सा सा ग ० | ग ० ग ० | रि रि ग ग | ग ० ग ० |
| शि व रा ऽ | या ऽ तें ऽ | प्र थ म न | मो ऽ नी ऽ |
| ग ० ग ० | ग ० ग रि | सा रि ग ० | री ० ० ० |
| आ ऽ रं ऽ | भीं ऽ या ऽ | क व ना ऽ | ला ऽ ऽ ऽ |
| सा ० नी. ० | ध. ० नी. ० | सा ० रि रि | ग म ग रि |
| की ऽ र्ती ऽ | ज्या ऽ ची ऽ | थ ऽ क्क क | रि त से ऽ |
| सा ० नी ० | ध ० नि नि | सा ० री ० | सा ० ० ० |
| सा ऽ न्या ऽ | भा ऽ र त | खं ऽ डा ऽ | ला ऽ ऽ ऽ |

याच चालीनें पुढील चरण.

## गीत २० वें— गवाक्षांतील सुंदरीस

| × | ० | × | ० |
|---|---|---|---|
| प ० प प | प॒ध॒नॕी॒ऽ॒ ध प | ग ० म प | म ० सा नि. |
| शू ऽ न्य मु | खीं ऽ ब घ | शीं ऽ ग ग | नीं ऽ म ज |
| सा ० ग ग | ० म प म | गॕ म गॕ रि | सा ० ० ० |
| सां ऽ ग सां | ऽ ग त व | का ऽ य म | नीं ऽ ऽ ऽ |

| | | | |
|---|---|---|---|
| सा ० ग म | प ० प ० | ग म म ० | ग रि सा सा |
| पा ऽ यां ऽ | पा ऽ शीं ऽ | व से ऽ ऽ | शा ऽ हि र |
| हृ ऽ द्वी ऽ | णे ऽ व रि | ध रि तो ऽ | सू ऽ ऽ र |
| रा ऽ ग आ | ऽ ळ वी ऽ | तु झा ऽ नि | रं ऽ त र |

| | | | |
|---|---|---|---|
| प ० प प | नीँ ध प ० | ग ग म प | म ० |
| बो ऽ ल त्या | ऽ शि तूं ऽ | म धु व च | नीं ऽ म ज |

या सबंध चालीनें पुढील प्रत्येक कडवें.

---

## गीत २१ वें—आळवणी

### ( चाल-चंद्र चवथिचा ) दादरा

| × | ० | × | ० |
|---|---|---|---|
| गॅ रि गॅ | सा रि नि. | सा ० ० | ० ० ० |
| हृ द य | रं ऽ ज | ना ऽ ऽ | ऽ ऽ ऽ |
| प्रा ऽ ण | जी ऽ व | ना ऽ ऽ | ऽ ऽ ऽ |
| सा नि. सा | रि रि ग | म म प | ग म ० |
| च र ण | क म ल | दा ऽ ख | वु नी ऽ |
| गॅ रि गॅ | सा रि नि. | सा ० ० | ० ० ० |
| रि झ वि | म ऽ न्म | ना ऽ ऽ | ऽ ऽ ऽ |

या चालीनें सर्व.

---

## गीत ३७ वें—हिंद-रमणी

( चाल–प्रिय अमुचा एक महाराष्ट्र हा० ) दादरा

| × | ० | × | ० |
|---|---|---|---|
| सां ० सां | ० सां सां | नि नि नि | नि नी ० |
| शो ऽ का | ऽ कु ल | व घु नि | तु ला ऽ |
| सां ० नि | धपध ऽ ग | म ० ० ० | ० ० ० |
| दुः ऽ ख | वा ऽ ट | तें ऽ ऽ ऽ | ऽ ऽ ऽ |
| गॅ गॅ गॅ | गॅ गॅ सा | ग ० ग | म प ० |
| ग म वि | शि स्वा ऽ | तं ऽ त्र्य | उ रीं ऽ |
| गॅ ० रि | सा रि नि. | सा ० ० | ० ० ० |
| भ ऽ ल्ल | शि र त | से ऽ ऽ | ऽ ऽ ऽ |

या चालीनें पुढील सर्व कडवीं.

---

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्।
यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥

समाप्त